

श्री. नानासाहेब नारळकर

यांस —

# सादर समर्पण

— वि. वि. बोकील

# कथाक्रम

# श्री. बोकील यांचें वाङ्मय

| | | |
|---|---|---|
| १ | फोल आशा | ( कादंबरी ) |
| २ | वळवांचे पाऊस | ( कथासंग्रह ) |
| ३ | गारांचा वर्षाव | ,, |
| ४ | जलधारा | ,, |

## आगामी

| | | |
|---|---|---|
| ५ | मांडवावरील वेली | ( कथासंग्रह ) |
| ६ | मंगळागौरीच्या रात्रीं | ( कादंबरी ) |

# जखम : : १

शस्त्रानें जखमा होतात, त्याप्रमाणें शब्दानेंहि जखमा होतात. शस्त्रानें झालेल्या जखमेवर थोडक्याच कालानें खपली धरते; परंतु शब्दाची जखम दीर्घकाल चिघळत राहते; आणि वेळींच उपाययोजना झाली नाहीं तर ती वज्रलेप होण्याचाहि संभव असतो.

आजपर्यंत इतिहास हा विषय अत्यंत उद्बोधक पद्धतीनें शिकविणारे शिक्षक पुष्कळ होऊन गेले असतील आणि पुढेंहि होतील. मागच्यांची आपल्याला कांहींच माहिती नाहीं; आणि पुढच्यांचा विचार करण्याचें आपल्याला कांहींच कारण नाहीं. परंतु विद्यमान इतिहास-शिक्षकांमध्यें गोविंदराव धडपळे यांना फारच वरचें स्थान द्यावें लागेल यांत शंका नाहीं. त्यांच्या हाताखालचे विद्यार्थि वेळप्रसंगीं त्यांचा मार खाऊनसुद्धां त्यांची स्तुतीच करीत आणि वेळीं-अवेळीं त्यांच्याकडून चहा उकळणारे त्यांचे मास्तर-मित्र त्यांची पश्चात् निंदाच करीत. यावरून त्यांची लोकप्रियता स्पष्ट होण्या-जोगी आहे. गोविंदरावांच्या नांवापाठीमागें अगर पुढें कोणत्याहि तऱ्हेचें पदवीचें वा गौरवाचें शेपूट नव्हतें, त्यांनीं शिक्षणशास्त्रांतील कोणतीहि परीक्षा दिली नव्हती किंवा व्याख्यानाला बसले नव्हते. त्यांना नवीन शिक्षणपद्धतीं-तील प्रश्नोत्तरांची भानगड चिलकूल ठाऊक नव्हती आणि ती माहिती करून घेण्याची धडपड त्यांनीं कधींच केली नाहीं.

परंतु त्यांना ठाऊक होतें कीं घंटा झाली, कीं समोर बसलेल्या विद्यार्थ्यांच्या अधाशी डोळ्यांकडे एकवार पाहायचें, घसा साफ करायचा आणि बोलायला सुरुवात करायची. सुमारें ४५ मिनिटें खणखणणाऱ्या रुपयांच्या आवाजाप्रमाणें होणारे तालस्वरबद्ध असे स्वतःच्या उच्चारांचे आवाज ऐकण्यांत त्यांची तंद्री लागत असे. उत्तम वक्त्याला ज्याप्रमाणें स्वतःचा आवाज प्रिय असतो, त्याप्रमाणें गोविंदराव आपल्या बोलण्याच्या आवाजावर अत्यंत खूष असत. त्यांना मग कशाचें भान राहत नसे. मुलेंहि औत्सुक्यानें त्यांच्या प्रत्येक वाक्याची वाट पाहत असत; आणि त्या तासापुरते तरी त्यांचे अनेक धंदे बंद पडत असत.

गोविंदरावांचें साधें बोलणें सुद्धां खणखणीत असावयाचें. स्नेहीमंडळी आणि विद्यार्थिपरिवार यांच्याशीं बोलतांना जणूं काय ते हुकूम करीत आहेत अशा थाटांत त्यांचें बोलणें चाले. विद्यार्थि मुकाट ऐकून घेत. परंतु स्नेहीमंडळी, विशेषतः बरोबरीचे शिक्षक, साहजिकच जरा घुश्शांत येत. गोविंदरावांची विनंतीसुद्धां हुकुमी आवाजांत यावयाची. हा त्यांचा दोष नव्हता—त्यांची ती एक विशिष्ट लकब होती. परंतु दुसऱ्याचें उणें काढण्याचाच संपूर्ण मक्ता घेणाऱ्या शिक्षकवर्गाला त्यांच्या वाणींत घमेंडखोरपणाचा वास येत असे. त्यामुळें विषयांचें संपूर्ण ज्ञान, ते समजावून देण्याची अप्रतिम हातोटी आणि कोणाच्याहि अध्यांत वा मध्यांत नसण्याची वृत्ति, इत्यादि गुणांचा समुदाय त्यांच्यापाशीं प्रकर्षानें वास करीत असतांनासुद्धां त्यांच्याविषयीं इतर शिक्षकांचें मत चांगलें नव्हतें एवढें मात्र खरें.

गोविंदरावांनीं कोणाचीच किंवा कशाचीच पर्वा केली नाहीं. नेमून दिलेल्या इयत्तांवर नियमित शिकवायचें, तें मात्र मन लावून शिकवायचें, आणि तें करीत असतांना स्वतःच रंगून जावयाचें एवढेंच ध्येय त्यांच्यापुढें होतें आणि तें ध्येय आज जवळ जवळ १५ वर्षें त्यांनीं डोळ्यांपुढें ठेविलें होतें.

एकदां एक उमदा इन्स्पेक्टर शाळा-तपासणीस आला असतांना कर्मधर्मसंयोगानें गोविंदरावांच्या वर्गावर आला. गोविंदराव आपल्याच वक्तृत्वाच्या ओघांत वाहत चाललेले होते. इन्स्पेक्टर नुकताच इंग्लंडहून जाऊन आलेला होता. एका महिन्यांत हिंदुस्थानचें इंग्लंड बनविण्याचा त्याचा महत्त्वाकांक्षी विचार होता. आणि इतर विषयांप्रमाणें इतिहास शिकविण्याचीसुद्धां त्याची

स्वतःची अशी एक अभिनव पद्धत होती. गोविंदरावांची पद्धत त्याच्या पद्धतीशीं १२० अंशांचा कोन करणारी होती. इन्स्पेक्टर सुमारें १० मिनिटें स्वस्थ बसला; परंतु त्याच्यानें फार वेळ स्वस्थ बसवेना. परंतु सभ्यतेस अनुसरून मुलांच्या देखत त्याला बोलतां येईना. त्यानें शाळेच्या हेडमास्तरांशीं गुजगोष्टी केल्या आणि तासानंतर गोविंदरावांची त्यानें सडकून हजेरी घेतली. गोविंदरावांनीं त्या इंग्लंडच्या बोटींतून उतरणाऱ्या गांवठी साहेबास शेवटीं एवढेंच सुनवलें—" मी आज पंधरा वर्षं ह्या पद्धतीनं शिकवीत आलों आहे. माझ्या हाताखालचे विद्यार्थि आज प्रोफेसर होऊन गेले आहेत. ह्या पद्धतीनं मीं त्यांचं कोणतंच नुकसान केलेलं नाहीं आणि यापुढं माझी पद्धत हीच—"

हेडमास्तर गोविंदरावांना ओळखून होते. 'आत्तां खुर्चीला शोभा आली' म्हणून 'हॅ हॅ हॅ' करीत प्रत्येक नवीन येणाऱ्या हेडमास्तरांपुढें ठराविक लांगूलचालन करून आपली नोकरी टिकविणाऱ्या बुद्रुक शिक्षकांपैकीं ते नव्हते हें त्यांना पूर्ण माहीत होतें. त्यांनीं इन्स्पेक्टरच्या म्हणण्याप्रमाणें कांहीं केलें नाहीं. गोविंदरावांची पद्धत पुन्हा सुरळीत चालू झाली.

गोविंदराव एकांडे शिलेदार होते यांत बिलकूल शंका नव्हती; परंतु त्याला जबाबदार परिस्थिति होती. पुरुष हा जात्याच 'हम करे सो कायदा' या वृत्तीचा असतो. त्याची ही ताठर वृत्ति नाहींशी करून त्याला समाजप्रिय करण्याचें काम त्याच्या भोंवतालचा स्त्रीवर्ग करीत असतो. गोविंदरावांना आई आठवत नव्हती. भगिनीच्या सहवासाचें सौख्य त्यांच्या नशिबीं नव्हतें. लग्नानंतर त्यांची पत्नी मात्र त्यांना माणसांत आणण्याचा खूप प्रयत्न करीत असे. उपरोधाचें जाज्वल्य अस्त्र तिच्या हातांत होतें आणि त्या अस्त्राचा नियमित उपयोग ती करीत असे. सुमारें ८ वर्षें म्हणजे वयाची तिशी ओलांडीपर्यंत गोविंदराव पत्नीच्या अनुरोधानें वागत असत. कोणतीहि गोष्ट केली, कीं 'बायको आपली चेष्टा तर करणार नाहीं ना?' या विचारानें ते क्षणभर गडबडून जात असत. पत्नी असेतोंपर्यंत गोविंदरावांच्या स्वभावांतील हा एकलकोंडेपणा फारसा लोकांच्या दृष्टीस पडला नाहीं. चांगलें दिसलें तर श्रेय पतीकडे व वाईट दिसलें कीं त्याचें खापर तिनें आपल्या डोक्यावर घ्यावें

हें आजकालच्या तरुणींना आश्चर्यचकित करून सोडणारें व्रत तिनें आठ वर्षे चालविलें होतें. परंतु मध्येंच विषमानें तिला हें सौख्य फार दिवस लाभूं दिलें नाहीं. किशोरी नांवाच्या ४ वर्षांच्या गोड मुलीला गोविंदरावांच्या हवालीं करून तिनें त्यांचा कायमचा निरोप घेतला.

आज त्या गोष्टीला ८ वर्षे होऊन गेलीं होतीं. गोविंदरावांनीं विधुरावस्था आजपर्यंत कायम ठेविली होती. बायकोवर अत्यंत प्रेम म्हणून, किंवा आपल्या मुलीला सावत्रपणाचा त्रास नको म्हणून, किंवा 'सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वताएवढें' या म्हणीची सत्यता पटल्यामुळें म्हणून, त्यांनीं वय आणि वित्ताची अनुकूलता असून सुद्धां दुसरें लग्न केलें नाहीं असें नव्हतें. त्यांच्या मूळच्या स्वभावानें उचल खाल्ली. दुसऱ्याच्या जरबेखालीं, मग प्रेमाची जरब असली तरी सुद्धां, राहण्यास त्यांचें मन तयार होईना. त्यांना कोणाचाच धाक नको होता.

एकदां पत्नीनें तांदूळ न धुतां वैरलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांनीं लगेच तिला कोंड्याचें महत्त्व आणि व्हिटॅमिन्सचे फायदे हा विषय समजावण्यास सुरुवात केली. पत्नीनें शांतपणें ऐकून घेतलें व शेवटीं एकच वाक्य उच्चारलें, "तुम्ही काय मला शाळेंतलीं मुलं समजतां?" गोविंदराव मुकाट्यानें आंघोळीला गेले.

इन्स्पेक्टरपुढें ठणठणीतपणें बोलणारे गोविंदराव पत्नीपुढें नेहमीं माघार घेत असत. तिच्या त्या बोलण्यापुढें त्यांना स्वतःचे मुद्दे आठवतच नसत.

पुन्हा असला अनुभव त्यांना नको होता. त्यांना राहिलेलें आयुष्य स्वतःच्या विषयांत पूर्णपणें रंगविण्यांत घालवावयाचें होतें; आणि चिमुरडी किशोरी होतीच कीं त्यांच्याजवळ! तिच्याकरितां आपण जगूं, फार मोठें होऊं, तिला आपल्याविषयीं अभिमान वाटायला लावूं हे विचार त्यांच्या डोक्यांत घोळत असल्यामुळें त्यांनीं दुसऱ्या लग्नाच्या वाजंत्र्या वाजूं देण्याचें नाकारलें. आप्तांतल्या एका गतभर्तृकेची मनधरणी करून घरांतील व्यवस्था पाहण्याकरितां तिला बोलावून घेतलें होतें. ती आज आठ वर्षे त्यांच्याकडे होती.

परंतु पत्नीचा धाक त्यांच्या पाठीमागें जसा होता तसा आतां कोणाचाच राहिला नाहीं. किशोरी तर काय जाणूनबुजून मूलच. घरांत व्यवस्था बघणारी

स्त्री केव्हांहि झालें तरी मालकाच्या मर्जीप्रमाणेंच वागणार. त्यांतून यमूताईला दुसऱ्याचा आधार फारसा नसल्यामुळें, तिला सध्यांची सुखाची गुलामगिरी टिकवावयाची होती. तिनें एका शब्दानेंहि गोविंदरावांना दुखविलें नाहीं. उलट वरकरणी असो किंवा मनापासून असो गोविंदरावांच्याबद्दल स्तुतीपेक्षां दुसरा जादा शब्द गेल्या आठ वर्षांत तिच्या तोंडून निघाला नव्हता. किशोरी-ला ती संभाळी; परंतु गोविंदरावांची मुलगी म्हणून ती तिला जवळ करी.

किशोरी लहान होती तोंपर्यंत कांहींच हरकत नव्हती आणि अडचणीचा प्रश्न कोठेंहि निघाला नाहीं. परंतु कालमानाप्रमाणें किशोरी मोठी होऊं लागली, शाळेंत जाऊं लागली व मैत्रिणींच्याकडून बरेंचसें नको असलेलें ज्ञान पैदा करूं लागली. तिच्या चिमुकल्या मेंदूला न झेपणारें ज्ञानसुद्धां तिला हलके हलके जमा करतां येऊं लागलें. आणि विशेष म्हणजे त्या ज्ञानाची सत्यता पटवून घेण्याकरितां ती घरीं धडपड करूं लागली.

सुमारें ७ वर्षांची असतांना तिला मैत्रिणीनें सांगितलें होतें, कीं दाराची कडी वाजवली म्हणजे घरांत भांडणें होतात. यमूताई जरी दूरची नातलग होती, तरी गोविंदरावांच्या विश्वासू स्वभावामुळें ती घरांतली जवळ जवळ मालकीणच बनली होती. प्रत्येक गोष्ट आहे-नाहीं पाहण्याचें काम तिचें असल्यामुळें, साहजिकच किशोरीच्या हातून होणाऱ्या नासधूस, मोडतोडीकडे लक्ष देणें तिचें कर्तव्य होतें. परंतु किशोरीला हा सासुरवास वाटूं लागला. मैत्रिणींच्या सल्ल्याप्रमाणें ती मधून मधून यमूताईना टाकून बोलूं लागली. आणि काळजाला घरें पाडणारीं बोलणीं मोठ्या माणसांपेक्षां लहान मुलें अजाणतेपणीं फार सफाईनें बोलूं शकतात. अशा या नावडत्या यमूताईचें व अण्णांचें (गोविंदरावांचें) कडाक्याचें भांडण व्हावें म्हणून एके दिवशीं माजघराची कडी जोराजोरानें वाजवण्याचा तिचा क्रम सुरू होता. यमूताईनीं तिला नेहमींप्रमाणें 'कडी वाजवूं नकोस' म्हणून दटावलें. यमूताईच्या दटावण्याला भीक घालणारी किशोरी नव्हती. तिनें 'वाजवीन जा' म्हणून गाल फुगवीत म्हटलें व पूर्वींच्यापेक्षां दुप्पट उत्साहानें कडी वाजवण्यास सुरुवात केली. शेवट व्हायचा तोच झाला. गोविंदराव व यमूताई हीं आपसांत भांडलीं नाहींत आणि गोविंदरावांच्या हातची एक सणसणीत चापटी

मात्र किशोरीला सहन करावी लागली. क्षुल्लक गोष्ट, परंतु पितापुत्री-मधील तेढीची ही पहिली सलामी झाली. आपण मुलीकरितां इतकी धडपड करीत असतांना मुलीनें असें चमत्कारिक वर्तन करावें याचा गोविंद-रावांना उलगडा होईना; आणि अण्णांनीं आपली बाजू सोडून, एका परक्या बाईची बाजू धरावी याचा किशोरीला उलगडा होईना.

किशोरी जसजशी मोठी होऊं लागली तसतशी जास्त शहाणी होत चालली. अण्णा आपल्यावर माया करतात हें तिला ठाऊक होतें व आपल्यालाहि माया करायला अण्णाशिवाय दुसरें कोणी नाहीं हेंहि ती जाणून होती. परंतु गोविंदरावांचें साधें बोलणेंसुद्धां तिला अन्यायाचें व जुलमाचें वाटूं लागलें.

सुमारें दहा वर्षांची किशोरी झाली होती. वाढत्या वयाबरोबर– दुसऱ्यावर अवलंबून असण्याचा लहान मुलांचा स्वभाव ती पूर्णपणें विसरली होती; आणि त्यांतल्या त्यांत आईविना राहणारीं मुलें फार लवकर परिस्थिति ओळखतात. लहानगी किशोरी अण्णा घरीं आले म्हणजे धावत धावत जाऊन त्यांच्या गळां पडत असे, त्यांच्या भरगच्च मिशा रग लागेपर्यंत ओढून ओढून त्यांना नकोसें करून सोडीत असे, त्यांच्याशीं प्रहरन्प्रहर गप्पागोष्टी करून त्यांना पुरेसें करून सोडीत असे. गोविंदरावांना त्यांतच परमानंद वाटत असे. लहान मुलानें डोळ्यांत बोट खुपसलें म्हणजे डोळा सलत असला तरी त्यांतच मौज वाटते. गोविंदरावांच्या जीवनांत किशोरी हाच एक आशेचा किरण होता. किशोरीच्या या हल्ल्यानें त्यांचे होणारे हाल ते आनंदानें सहन करीत असत. इतकेंच नव्हे तर ती विसरली तर मिशा उपटून घेण्याकरितां ते आपलें तोंड मुद्दाम तिच्यापुढें करीत असत. डोळ्यांतून पाणी आलें म्हणजे त्यांना समाधान वाटे. लहानगी किशोरी रात्रीं निजतांना अशी लगट करून निजे, कीं उन्हाळ्याच्या दिवसांत गोविंदरावांना ही शिक्षाच वाटे. परंतु झोपेंत– अर्धवट जागृत स्थितींतसुद्धां– त्या गुलाबी मखमलींतून 'अण्णा' असा अर्धस्फुटित उच्चार ऐकला, कीं त्यांनींसुद्धां जास्तच कवटाळून धरावें.

परंतु पुढें हा गोडवा हळूहळू नाहींसा होत चालला. आधींच स्वतःच्या कटकटीनें गांजलेल्या गोविंदरावांनीं एके दिवशीं किशोरीचें अंथरूण यमूताईच्या जवळ घातलेलें पाहिलें. कांहीं तरी चुकत आहे अशी त्यांच्या मनाची बोचणी

सुरू झाली. परंतु मनावर इतर विचारांचें दडपण आणून त्यांनीं या प्रकाराबाबत मौन स्वीकारलें. असें प्रत्येक बाबतींत होऊं लागलें.

अगदीं परवां-परवांपर्यंत शाळेंतून घरीं आल्यावर शाळेंत काय काय झालें याची किशोरीनें चौकशी केल्याशिवाय गोविंदराव इतर व्यवसायांत लक्ष घालीत नसत. परंतु तोहि प्रकार पुढें बंद झाला. किशोरी हळूहळू वडिलांना टाळूं लागली होती हें स्पष्टच होतें. कां ?

गोविंदरावांच्या मतें बारा वर्षांची किशोरी म्हणजे एक जबाबदारी होती. आई नसल्यामुळें आणि यमूताईचें कांहींच चालत नसल्यामुळें किशोरीला वळण लावण्याचें काम आपलें आहे व तें आपण नीट लक्ष लावून पार पाडलें पाहिजे हा त्यांचा विचार. त्याकरितां 'मोठ्यानें पाय आपटीत आपटीत चालूं नकोस', 'ओलेत्यानें बाहेर येत जाऊं नकोस', 'सिनेमांतलीं गाणीं म्हणूं नकोस', 'हें करूं नको आणि तें करूं नको' इत्यादि 'नको'ची मशीनगन एकदां सुरू झाली, कीं किशोरी साहजिकच चिडून जाई. मुलींनीं काय करूं नये हें गोविंदरावांना आपल्या इतिहासाच्या ज्ञानाइतकें स्पष्ट दिसत असे; परंतु मुलींनीं काय करावें हें मात्र त्यांना सांगतां आलें नसतें. किशोरी त्यांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांच्या 'नको'ला मान द्यायला तयार होती. पण जोंपर्यंत तिनें काय करावें हें ते सांगत नव्हते तोंपर्यंत तिनें आपल्या मनाची निराळीच समजूत करून घेतली होती. वडिलांचें 'नको'चें व्याख्यान ऐकण्यापेक्षां त्यांच्यापासून दूर राहण्यांतच शहाणपणा आहे हें किशोरीनें ओळखलें.

एके दिवशीं संध्याकाळचा प्रसंग. शाळेंतील रोजची जिकीर कशी तरी संपवून घराच्या विसांव्याला गोविंदराव नुकतेच परतले होते. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें हात-तोंड धुऊन यमूताईनीं दिलेल्या चहाचे घुटके घेत ते बाहेरच्या कॉटवर बसले. एकाएकीं त्यांना आठवण झाली, कीं सकाळीं किशोरी मावशीकडे का कोणीकडे जाण्याची परवानगी मागत होती व आपण नादामध्यें तिला जरा तुसडेपणानें, 'जरा थोडंसं घरांतलं बघत जा आतां, गांवभर उकीरडा फुंकणं पुरे!' म्हणून म्हणालों होतों. आणि त्या वेळीं किशोरीनें केलेलें चमत्कारिक तोंड आतां त्यांना आठवलें. त्या वेळेस त्या चमत्कारिक चेहऱ्याचा अर्थ उद्दामपणा कीं वाईट वाटलेलें दाखविण्याची रीत ह्याचा उलगडा त्यांना

झाला नव्हता. ती जर आतां घरांतच असेलच तर तिला वाईट वाटलें असावें हा अर्थ स्पष्ट होईल या विचारानें त्यांनीं किशोरीस हाक मारली.

परंतु किशोरीऐवजीं यमूताईच पुढें आल्या !

" किशोरी कुठं आहे ? " प्रश्न साधा होता पण त्यांत जराशीं चिडखोरपणाची छटा होती.

" अजून शाळेंतून कुठं घरीं आली आहे ? " यमूताईंनीं प्रश्नाचें उत्तर प्रश्नानेंच दिलें.

गोविंदरावांच्या डोक्यांत कलीपुरुषानें हुतुतूचा डाव मांडण्यास सुरुवात केली !

" मला वाटतं, सकाळीं जेवतांना ती तुम्हांला विचारीत होती ? " यमूताई म्हणाल्या.

" पण मीं तिला स्पष्ट नकार दिला होता—" गोविंदराव त्रासिक मुद्रेनें म्हणाले.

" मी तरी काय बोलूं ? तिच्या बाजूनं बोललं तर मुलीची जात, शेफारून गेली तर पुढं तिलाच जड जाईल. बरं, माझं ती कांहींच ऐकून घेत नाहीं. तुम्हांला सांगावं तर चहाड्या करण्याचा आरोप माझ्यावर येईल. म्हणून माझा तुम्हांला कोणीकडूनहि या बाबतींत उपयोग नाहीं." यमूताई खरें तेंच बोलल्या.

गोविंदरावांचें लक्ष दुसरीकडेच कोठें तरी गुंतल्यासारखें दिसत होतें. ते अमळ भानावर येऊन अर्धवट स्वतःशींच पुटपुटले—" पाहतोंच तमाशा—"

निसर्गाचें कार्य बिनबोभाट चालूं होतें. उन्हें तिरपीं झालीं—थोड्या वेळानें दिसेनाशीं झालीं— अंधार हळूहळू पसरत चालला. आजूबाजूच्या एक-दोन घरांतून दिव्यांचा अंधुक प्रकाश लुकलुकूं लागला. थोड्या वेळानें रात्रीचा अंमल पद्धतशीर सुरू झाला. थोड्याफार वेळेच्या फरकानें आजूबाजूच्या घरांतून पडलेले आठाचे ठोके ऐकूं आले—परंतु किशोरीचा पत्ता नव्हता. गोविंदराव दारासमोर खुर्ची टाकून अंधारांतच बसले होते. यमूताईंनीं मुकाट्यानें येऊन दिवा लावला आणि जेवणाची वर्दी दिली. गोविंद-

रावांनीं 'भूक नाहीं' म्हणून गुरकावलें. तोंडानें 'टॅक्' असा आवाज काढीत यमूताई मागल्या पावलींच परतल्या.

घामाघूम झालेली, काय होईल या भीतीनें उडणाऱ्या छातीवर एका हातानें दाब देत व दुसऱ्या हातांत असलेलें एक गाठोडें लपवीत किशोरी बरोबर ८। वाजतां चोरट्या पावलानें मागील दारानें घरांत .शिरली. कोणत्याहि दारानें शिरली म्हणून होणारें थोडेंच टळणार होतें ? परंतु मनुष्य-स्वभाव हा कीं, आजची आपत्ति शक्यतोंवर उद्यांवर ढकलावयाची. गोविंद-रावांनीं तिला पुढच्या खोलींतून हाक मारली. खालच्या मानेनें किशोरी वडिलांसमोर उभी राहिली.

" कुठं गेली होतीस ? " गोविंदरावांनीं नेहमींच्या आवाजांत प्रश्न केला.

उत्तर नाहीं. गोविंदरावांनीं तोच प्रश्न तीनदां उच्चारला.

" मावशीकडे—" डबडबलेल्या नेत्रांनीं वडिलांकडे पाहत किशोरीनें उत्तर केलें.

" मीं नको म्हणून सांगितलं असतांनासुद्धां ?" गोविंदरावांचा आवाज न कळत चढला होता.

" मला ती पुष्कळ दिवस आग्रह करीत होती—" किशोरी कापऱ्या आवाजांत, शुष्क झालेल्या ओठांवरून जिभेचा शेंडा हळूच फिरवीत म्हणाली.

" मग तिच्याकडे कां जाऊन राहत नाहींस ? ज्या घरांत आपलें जमत नाहीं त्या घरांत माझ्यासारख्यानें पाणीसुद्धां घेतलें नसतें. मावशीला इतका पुळका असेल तर संभाळ म्हणावं—आणि मावशीकडे इतका वेळ काय करीत होतीस ?" गोविंदराव म्हणाले.

किशोरीनें भयभीत नजरेनें आसपास पाहिलें. तिला कळून चुकलें, कीं जगांत आपलें कोणी—कोणीसुद्धां नाहीं. आणि ही जाणीव विशेषतः बाल-मनाला फारच जाचत असते. काडीचा आधार म्हणून तिनें घरांत यमूताई-कडेसुद्धां पाहिलें परंतु त्या दूर होत्या.

" वाचा बसली का ?— " गोविंदरावांनीं पुन्हा प्रश्न केला.

" मावशीनं मला पातळ घेऊन देण्याकरितां बाजारांत नेलं होतं–" किशोरी कसें तरी बोलली. तिच्या डोक्यांत कसले तरी ठोके पडत होते. छातीचे ठोकेसुद्धां तिला स्पष्ट ऐकूं येत होते. तिचें अवसान सुटत चाललें.

" पैसे कुठले ? "

गोविंदरावांचा हाच प्रश्न किशोरीला नको होता. मागील तीनचार वर्षांचे ओवाळणीचे पैसे तिनें साठवून ठेविले होते. दरवर्षी दिवाळींत तिला मावसभावाकडून ५-६ रुपये मिळत असत ते गोविंदरावांनीं एका स्वतंत्र पाकिटांत घालून स्वतःच्या ट्रंकेंत कुलपांत ठेवून दिले होते. असे दरवर्षाचे पैसे जमवून लग्नांत " तुला, मी जमलेल्या पैशांइतकेच माझे पैसे भरीला घालून तुझ्या म्हणण्याप्रमाणें एखादा मनपसंत जिन्नस घेऊन देईन, तोंपर्यंत त्याला हात लावायचा नाहीं—" असें म्हटलें होतें. त्याच पैशावर तिनें आज दुसरी किल्ली चालवून डल्ला मारला होता. आपल्या सुटकेचा मार्ग म्हणजे, काय होईल त्याला तोंड देणें हा एकच ! या निराशायुक्त विचारानें तिनें जीव मुठींत घेऊन उत्तर केलें--

" माझे ओवाळणीचे पैसे–"

गोविंदराव ताडकन् खुर्चीवरून उठले. त्यांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. कारटीनें शेवटीं चोरी केली ! हा विचार त्यांना असह्य होता. त्यांनीं आधींच थरथरणाऱ्या किशोरीच्या श्रीमुखांत लगावली.

किशोरी, वादळांत सापडलेल्या केळीप्रमाणें धाडकन् खालीं पडली– ! परंतु उभी असतांना जी भित्री किशोरी वडिलांना तोंड देत होती, ती पडलेली किशोरी आतां पूर्णपणें बदलली होती. ज्याला ती भीत होती तो प्रकार होऊन चुकला होता. आतां भिण्याचें काय कारण होतें ? तिनें संतापानें थरथरणाऱ्या हातानें केस मागें सारले, खालचा ओठ जोरानें चावला, आणि शांतपणानें वडिलांकडे एकवार रोखून पाहिलें—

" कां मला मारलंत ? माझे पैसे– मला बक्षीस म्हणून मिळालेले पैसे– तुम्ही दाबून ठेवतां– मला पाहूंसुद्धां देत नाहीं आणि ते मीं घेतले तर तुम्ही मला मारतां ? कां मला मारलंत ? मी खोटं बोललें ? खरं तेंच मीं सांगितलं. मला पातळ आणून द्या म्हणून मी किती दिवस तुम्हांला सांगितलं. तुम्ही नाहीं म्हणून

म्हणालांत. तुम्हांला वाटलं 'मी वाटेल तसं करीन.' आई मेली तेव्हांपासून तुम्ही मलाहि मारायला बसलां आहांत— टाका मारून मला एकदां. आईच्याप्रमाणं मीहि मेलें म्हणजे मग बसा आमच्या नांवानं रडत—" किशोरी काय बोलली हें तिचें तिला तरी कळलें कीं नाहीं कुणास ठाऊक! समजावयास लागल्यापासून आजवर तुंबलेला आवेश आज कोंडी फोडून वेगानें बाहेर पडला होता. आतां तिला माराची भीति नव्हती— मरणाची नव्हती, गोविंदरावांची तर नव्हतीच नव्हती.

पत्नीचा उल्लेख पोरीनें केल्याबरोबर गोविंदराव गडबडले. क्षणमात्र किशोरीच्या रूपानें आपली पत्नीच हें बोलत आहे कीं काय असा भास त्यांच्या मनाला झाला. आजपर्यंत स्वतःच्या शहाणपणावर विसंबून राहणारे गोविंदराव किशोरीच्या या वक्तव्यामुळें बावरून गेले. असे शब्द उच्चारणाऱ्या कार्टीला सडकून झोडावी असें एक मन त्यांना सांगत होतें; परंतु दुसरें मन बजावीत होतें, कीं झाला एवढा प्रकार पुरे झाला, किशोरी आतां लहान मुलगी राहिली नव्हती.

सहजच त्यांनीं किशोरीकडे पाहिलें. त्यांना आश्चर्याचा झटका बसला– ! अगदीं तीच जिव्हणी, तेंच नाक, तेच डोळे आणि तेच बेडर पाहणें— किशोरी सर्वस्वीं आईवर पडली होती. त्यांच्यानें तें दृश्य पाहवेना. त्यांनीं डोकें दाबण्याच्या मिषानें हातांनीं डोळे घट्ट दाबून घेतले—

त्या दिवसापासून एकाच घरांत वावरणारे दोन जीव, एकमेकांवर प्राणापलीकडे प्रेम करणारे दोन जीव, दोन ध्रुवांवर राहिल्याप्रमाणें वावरूं लागले. दोघांच्याहि हृदयाला खोल जखमा झालेल्या होत्या. या भांडणाचा शेवट लागावा असें दोघांनाहि मनापासून वाटत असे. कित्येक वेळां किशोरी चोरट्या पावलांनीं बाहेरच्या खोलींत येई, परंतु गोविंदराव वाचनांत गर्क झालेले तिनें पाहिले, कीं पुन्हा स्वाभिमान उचल खाई. किशोरी टॉवेल नेण्याचें विसरून न्हाणीघरांत गेलेली दिसली, कीं गोविंदराव मुकाट्यानें दांडीवरचा टॉवेल ओढून न्हाणीघराच्या बाहेरच्या बाजूस ठेवून देत. अबोला मात्र कायम होता. वरकरणी एकमेकांचे शत्रु, पण मनांतून एकमेकांविषयीं कमालीची आस्था असा प्रकार चालू होता. एवढीशी १२ वर्षांची चिरमुडी पोर

पण ताठा किती होता ! भावनांचा प्रकर्ष लहान मुलांतच फार तीव्रतेनें पाहावयास सापडतो म्हणून म्हणतात तें खोटें नाहीं. आणि आपण मोठीं माणसें लहान मुलांना खेळांतील बाहुल्यांप्रमाणें वागवूं पाहतों !

एके दिवशीं रात्रीं जेवणेंखाणें आटोपल्यावर यमूताई शेजारच्या गणपतीच्या देवळांत कीर्तनाला गेल्या होत्या. माजघरांत किशोरी गळ्यांपर्यंत पांघरूण लपेटून घेऊन झोपली होती. गोविंदराव दुसऱ्या दिवशीं शिकविण्याचा भाग नजरेखालीं घालून पाहत होते. घड्याळांत ११ चे ठोके पडले त्यासरशीं गोविंदराव दचकून आपल्या तंद्रींतून जागे झाले. झोपण्यापूर्वीं पाणी पिण्याकरितां म्हणून ते आंत गेले. माजघरांत पहुडलेल्या त्या निराधार चिमणीकडे त्यांचें लक्ष गेलें. काय असेल तें असो, ते जागच्या जागीं खिळून राहिले ! हृदयाचा कुठलासा कोपरा किंचित् हलल्यासारखा त्यांना भास झाला. त्यांनीं क्षणभरच त्या निष्पाप चेहऱ्याकडे निरखून पाहिलें. याच जिवाकरितां आपण जिवाचें रान करीत असतों. हाच हाडामांसाचा गोळा केवळ आपला आहे. लहान असतांना कशी पण दुडदुड धावत असे. आई गेली त्या दिवशीं काय चाललें आहे हें न समजून बावरून गेलेल्या या चिमणीनें आपल्याला कसें घट्ट धरून ठेवलें होतें वगैरे विचारमालिका त्यांच्या डोक्यांतून विजेप्रमाणें चमकून गेली. ते कांहीं एक विचार न करतां खालीं बसले आणि त्यांनीं कौतुकानें तिच्या कपाळावर आलेल्या बटा सारख्या केल्या. किशोरीनें किंचित् चळवळ केली आणि झोपेंतच 'अण्णा' असें पुटपुटून मोठ्या विश्वासानें त्यांच्या मांडीवर हात टाकला. परंतु त्याच क्षणीं तिला जाग आली आणि काय वाटलें तिला कुणास ठाऊक, व वडिलांकडे अर्धोन्मीलित नेत्रांनीं एक क्षणभर पाहून तिनें हात काढून घेतला व दुसऱ्या कुशीवर वळून ती पुन्हा झोपीं गेली—गोविंदराव एक दीर्घ निःश्वास टाकून उठले— !

ह्या प्रसंगापासून मात्र गोविंदरावांना पुरतेपणीं कळून चुकलें, कीं आपल्या आयुष्यांत किशोरीशिवाय दुसऱ्या कोणालाहि स्थान नाहीं. किशोरीशिवाय आपला इतिहाससुद्धां रूक्ष वाटणार. आपलें पूर्वीचें अभिमानास्पद असें इतिहासशिक्षकाचें स्थान जर टिकवावयाचें असेल तर किशोरीच्या गोड भाषणाशिवाय तें शक्य नाहीं. आयुष्यांत जर सुरळीतपणा व आनंद पाहिजे असेल

तर किशोरीच्या तंत्रानेंच घेतलें पाहिजे. थोडक्यांत– आपला वडीलकीचा मान सोडून आपल्याला तिचा खेळगडी बनलें पाहिजे, तिला हसवलें पाहिजे, तिला रिझवलें पाहिजे, तिला फुलवलें पाहिजे. तिच्या मनाचा बारकाईनें ठाव घेतला पाहिजे. तिच्या चुका तिला तिच्याचकडून समजावून दिल्या पाहिजेत आणि वडील म्हणजे सर्वाधिकारी हुकूमशहा ही कल्पना विसरली पाहिजे.

किशोरीलासुद्धां चुकल्याचुकल्यासारखें वाटत होतें. पातळाच्या बाबतींत आपण अक्षम्य चूक केली, वडिलांना न सांगतां आपण परभारें कारभार केला व त्यामुळें वडिलांच्या मनाला इंगळ्या लागल्याप्रमाणें झालें हें तिच्या बालमनाला पटलें होतें. आपण वडिलांशीं धडपणानें बोलत नाहीं; आणि त्यामुळें त्यांना त्रास होत असला पाहिजे हें तिला पटत होतें. आपल्याकरितां वडिलांनीं काय त्रास सोसला असेल, काय त्याग केला असेल हें तिला अचूक माहीत नव्हतें, तरी पण वडील आपल्याकरितां पुष्कळ करीत असले पाहिजेत याची अस्पष्ट कल्पना तिला होती. आणि तिला तरी अण्णांशिवाय कोठें करमत होतें? अबोला सुरू झाल्यापासून ती आजूबाजूच्या व शाळेंतील मैत्रिणींबरोबर कसाबसा दिवस काढूं लागली. पण रात्रीं घरीं आल्यावर? छेः! शक्यच नव्हतें. आपलें कोठें तरी चुकत असलें पाहिजे असें वारंवार तिला वाटूं लागलें.

अशीच एके दिवशीं संध्याकाळीं मागील दारीं मैत्रिणींबरोबर ती खेळत होती. ती खेळत होती म्हणण्यापेक्षां इतरजणी खेळत होत्या व शून्यमनस्कतेनें ती त्यांचें खेळणें पाहत होती असें म्हटलें पाहिजे. लांब दूरवरच्या झाडावर असलेल्या एका पक्षिणीच्या घरट्याकडे तिचे डोळे खिळून राहिले होते. आपण जर त्या पक्षिणीचें पिलूं झालों असतों तर किती मौज झाली असती या विचारांत तिचें भान हरपून गेलें होतें. एकाएकीं कोणी तरी तिच्या वडिलांचें नांव उच्चारलेलें तिला ऐकूं आलें आणि तिनें खेळाकडे लक्ष लावलें. मुलींच्या नकला चालू होत्या. त्यांत एक वाड्यांतील मुलगी गोविंदरावांची नक्कल करीत होती. गोविंदरावांच्या उपरण्याबद्दल एक मळकेंसें फडकें तिनें खांद्यावर टाकलें होतें. त्यांच्या झुबकेदार मिशा दाखविण्याकरितां वेणीचे पेड सोडून पुढें तोंडावर घेतले होते आणि गोविंदराव जेवणानंतर 'अऽऽऽया' करून ढेकर देत त्याप्रमाणें आवाज काढण्याचा ती प्रयत्न करीत होती. प्रयत्न

तितकासा यशस्वी नव्हता; परंतु मुलींना हसायला तेवढेंच निमित्त पुरें होतें. प्रथम प्रथम किशोरीलासुद्धां त्यांत गंमत वाटत होती. परंतु नकलाकार मुलगी जसजशी जास्त आविर्भाव करूं लागली तसतसी किशोरी बावरूं लागली. कां कुणास ठाऊक, परक्या मुलीनें आपल्या वडिलांची चेष्टा करावी आणि आपण त्यांत मौज वाटून घ्यावी हें तिला आवडेना. आपले वडील कसेहि असले तरी इतके ओंगळ खास नाहींत आणि जरी असले तरी ह्या मुलीला त्यांची चेष्टा करण्याचा काय अधिकार?

"ए, तारे, अण्णांची नक्कल नाहीं करायची ग –" तिनें म्हटलें.

"अहा ऽऽऽऽ हा! काय पण पुळका—" तारीनें हात ओवाळीत म्हटलें.

"असूं दे. तुला काय करायचं आहे त्याच्याशीं? आमच्या अण्णांची नक्कल केलेली मला नाहीं आवडायची—" निश्चयाच्या स्वरानें किशोरी म्हणाली.

"काय पण—माहिती आहे—! पातळाचा मार समजला बरं का आम्हांला! आणि सुभे, आमचे काका कित्ती छान आहेत नाहीं ग? लिमलेट काय— अन् पेपरमिंट काय— अन् ब्लाऊज काय—चंगळ आहे आमची! आणि त्या गणपतीबुवाची ही लेक—! " तारीनें म्हटलें.

गोविंदरावांच्या सुटलेल्या पोटाला उद्देशून 'गणपतीबुवा' म्हणून त्यांना म्हटलेलें शांतपणें ऐकून घेणें किशोरीच्या सहनशक्तीबाहेरचें होतें. तिच्या डोळ्यांपुढें कसलासा प्रकाश चमकल्याप्रमाणें तिला झालें आणि फारसा विचार न करतां शेजारींच पडलेलें पाणी पिण्याचें भांडें तिनें नीट नेम धरून तारीच्या डोक्यावर भिरकावून मारलें—!

वाड्यांत हा गोंधळ उडाला! भांडें हलकें असल्यामुळें टेंगळापलीकडे कांहींच विशेष झालें नव्हतें. पण तारीच्या आईला तें टेंगूळ पर्वतीच्या टेकडी-प्रमाणें भासलें.

गोविंदरावांच्या कानांवर ही गोष्ट यथाक्रम गेलीच. आश्चर्याची गोष्ट ही, कीं गोविंदरावांनीं किशोरीला एका शब्दानें दुखवलें नाहीं; उलट ते गोंधळांत पडल्यासारखे दिसले. घटकाभरानें चोरट्या पावलानें किशोरी त्यांची क्षमा

मागण्याकरितां बाहेर आली असतांना वडिलांच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह चालत असलेला तिनें पाहिल्याबरोबर तिचा सगळा स्वाभिमान कोठच्या कोठें वितळून गेला ! ज्या पातळानें आपल्यामध्यें हा परकेपणा आणला त्या पातळाचा सोक्षमोक्ष करून टाकावा असें तिला वाटूं लागलें. आजपर्यंत वडिलांच्या डोळ्यांना पाणी आलेलें तिनें कधींच पाहिलेलें नव्हतें. आणि आज तो देखावा दिसल्याबरोबर तिची घाबरगुंडी उडाली—

त्या तिरीमिरींत तिनें ट्रंकेंतील पातळाची घडी बाहेर काढली आणि ती एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें तोंड करून गोविंदरावांच्या पाठीशीं उभी राहिली. गोविंदरावांना प्रथम किशोरीच्या या भांडें फेकून मारण्याचा उलगडा झाला नव्हता. ते या तिच्या नवीन वर्तनाचा अर्थ लावूं पाहत होते. जी मुलगी आपल्याशीं बोलायलासुद्धां राजी नाहीं, तिनें दुसऱ्या मुलीनें आपल्या वडिलांची चेष्टा करतांच भांडें फेकून मारावें याचा उलगडा त्यांना हळूहळू होऊं लागला. प्रेमाशिवाय चीड येणें शक्य नाहीं. आणि त्या प्रेमामुळेंच चिडून जाऊन किशोरीनें मागचा-पुढचा विचार न करतां हें कृत्य केलें होतें. हें प्रेमाचें प्रदर्शन और असलें तरी गोविंदरावांचा स्वाभिमान नाहींसा करायला समर्थ होतें. आणि त्याचमुळें आई आणि मुलगी या दोघींतील हें आश्चर्यकारक साम्य पाहून त्यांना एकदम रडूं कोसळलें. आपण एकटे नाहीं, आपल्या जिवाला जीव देणारी मुलगी पाठीशीं आहे ह्या विचारानें त्यांना अत्यानंद झाला. त्यांचें तें रडें आनंदाचें होतें, दुःखाचें नव्हतें. पाठीशींच उभी असलेली किशोरी हळूच 'अण्णा' म्हणून पुटपुटली. त्यांनीं घाईघाईनें डोळे पुसून मागें वळून पाहिलें. किशोरी हसऱ्या चेहऱ्यानें हातांतील कोऱ्या पातळाच्या चिंध्या चिंध्या करीत असलेली त्यांना दिसली. ते ताडकन् उठून उभे राहिले.

क्षणभरच गोविंदराव चपापल्यासारखे झाले व त्यांनीं किशोरीकडे जड डोळ्यांनीं पाहिलें. त्यांना हुंदका आवरेना. ज्या वात्सल्यानें त्यांनीं पांच वर्षांच्या चिमुरड्या किशोरीला जवळ घेतलें असतें त्याच वात्सल्यानें त्यांनीं आज बारा वर्षांच्या किशोरीला अल्हाद उचलून आपल्या समोरच्या टेबलावर बसाविलें. त्यांना काय बोलावें हेंच सुचेना. त्यांचें नेहमींचें वक्तृत्व आज

त्यांना पार सोडून गेल्यासारखें दिसत होतें. थरथरणाऱ्या हातांनीं त्यांनीं तिचे दंड धरले--

" किशे—किशे—खरंच का ग तुझा अण्णा तुला आवडतो?" त्यांच्या आवाजांत इतका कंप भरला होता, कीं हुडहुडी भरणाऱ्या माणसालासुद्धां यापेक्षां जास्त स्पष्टपणें बोलतां आलें असतें.

" अण्णा—अण्णा, खरंच का हो तुमची किशी तुम्हांला आवडते?" किशोरीनें रडत रडत म्हटलें.

दोघेंहि किती तरी वेळ डोक्यास डोकें लावून अश्रूंस वाट करून देत होतीं!

# निळोबाचा गाथा : : २

> " नीलकंठराव पी. पाध्ये, बी. ए.
> -OUT"

असें दरवाजावरील पाटी कांचेची फ्रेम फोडून सर्वांना सांगत होती. परंतु विनायकानें तिच्या म्हणण्याकडे पूर्णपणें दुर्लक्ष केलें आणि दरवाजाची फळी लाथेसरशीं उघडून आंत एका कोपऱ्याशीं वळकटीवर शांतपणें पहुडलेल्या 'नी. पी., बी. ए.'च्या पायावर बरोबर आणलेल्या पुस्तकांपैकीं एक पुस्तक जोरानें आपटलें.

" नीळकंठराव घरांत नाहींत " असे उद्‌गार बाहेर पडले.

" घरांत नाहींत ? ते स्मशानांत नाहींत, हॉटेलांत नाहींत, किंवा एखाद्या नाटक कंपनीच्या बिऱ्हाडीं नाहींत. किंवा यंदा सालाबादप्रमाणें अजून एखादी हृदयदेवताहि पण त्यांच्या दृष्टिपथांत आलेली दिसत नाहीं, म्हणून ते बाहेर नाहींत. मग ते कुठं आहेत ? " असें म्हणत विनायकानें हसण्यास प्रारंभ केला.

" ते कुठं आहेत ? ' मेले जित असो निजोनिया जागे । ' विनू, गंभीरपणानें ऐकून घे. विनू, आतां पूर्वींचे ते थट्टेचे दिवस विसर. आतां आजपासून, ' बोलणेंच नाहीं । आतां सिंधूवीण कांहीं ॥ निळू म्हणे मनें । हेंची

संकल्प वाहणें ॥' आलं लक्षांत ? म्हणून आजपासून मी या जगांत नाहीं असंच समज !" हळूहळू निळूभाऊ उठून बसले.

"ताप किती आहे अंगांत ?" विनूनें पुन्हा हसण्यास सुरुवात केली.

"विनू, तुला कितीदां सांगूं, कीं हा प्रकार थट्टेचा नाहीं." निळूभाऊ गंभीरपणानें म्हणाले.

"मग हें तूं असं वेड्यासारखं काय करतो आहेस ? कुठली पोरगीन् कसलं प्रेम ? पाहिली पोरगी कीं बसलं प्रेम, म्हणजे पाहिलं दुकान, घेतलं पैशाचें पेपरमिंट —असला हा वेडेपणा—" विनूचें वाक्य अर्धवट राहिलें.

"चूप. प्रेमच मुळीं वेडं आहे. मग त्याच्या छायेखालीं आलेलं माणूस कां बरं वेडं होणार नाहीं ? 'निळू म्हणे माझी जळो जळो काया। सिंधू सखया वांचूनिया ॥'" निळू म्हणाला.

"मग म्हण पुढं आतां—पुंडलीक वर दे हारि विठ्ठऽऽऽल !" विनू म्हणाला.

"तुला अजून प्रेमाची महती कळलेली नाहीं—" निळूभाऊ म्हणाले.

"पण ती तूं सांगूं नकोस ! जगांतल्या पुष्कळशा गोष्टी ज्याच्या त्यालाच शिकायच्या असतात. हें प्रेम माझं मलाच शिकूं दे." विनू म्हणाला.

"तरी पण मला राहवत नाहीं. तुम्हां तरुणांना अलीकडे सगळ्याच गोष्टी काबुली फुटाण्यासारख्या वाटूं लागल्या आहेत. प्रेमाची परिणती विवाहांत होत असते. अहाहा-( विनू—आऽऽहाऽऽऽहाऽऽऽ ) काय तें रम्य जीवन ! यदृच्छेनं परस्परांच्या मंगल साहचर्यांत व गोड सहवासांत विवाहरज्जूनं निगडित झालेल्या दोन जीवांना जगांत किती तरी शिकण्यासारखं आहे. आत्म-निरीक्षण, आत्मशुद्धि करून घ्यायला, परस्परांच्या सहवासांत परस्परांचीं अंतःकरणं खुलीं करून—

'भावची कारण भावची तारण। मोक्षाचें साधन बोलीयेलें ॥'

ही शिकवण प्रत्यक्ष संसारांत आचरून मानवी जीविताचं साफल्य करून घेण्यास या विवाहित आयुष्याशिवाय दुसरा सुकर मार्ग नाहीं—" निळू-भाऊंनीं हळूच नाजुक रीतीनें आपल्या झुबकेदार केसांतून हाताचीं बोटें फिरविलीं.

" म्हणजे आज तूं चहाच्या पाण्याऐवजीं ह्या संसारामृताचा घुटका मला पाजलास असंच मी समजतों—" विनू म्हणाला.

" 'निळू म्हणे भाव नाहीं करी सेवा। तेणें काय देवा योग्य होसी?॥' विनू, सोडून दे हा पोरकटपणा आतां."

" बरं, धरतों पोक्तपणा—पण चहा मिळेल या एका अटीवर."

" अरे! अरे! अरे! 'आशा हे समूळ खणोनी काढावी' " निळूभाऊ म्हणाले.

" होय! पण मला इतक्यांतच कांहीं गोसावी बनायचं नाहीं. उलट मी तर म्हणतों, तुझ्यासारख्या संतानं मला इतका वेळ आशाळभूतपणानं स्वस्थ बसायला लावून त्रास देणं योग्य नाहीं. कारण. 'संत उदार उदार, भरलें अनंत भांडार।' घरामधें शेर दीडशेर दूध शिल्लक असेल. तुझ्या वहिनी घरांत नसतील; तर चल आपणच चहा करूं." विनूनें निळूभाऊंना हाताला धरून उठवलें.

॥ २ ॥

निळूभाऊ ही एक व्यक्ति होती यापलीकडे त्यांचें फारसें शब्दचित्र देतां येणें शक्य नाहीं. निळूभाऊ हा कॉलेजांतला तुकाराम होता, 'घरामध्यें आहेत झालं भाउजी' होता, रस्त्यामध्यें मोटारींना, टांग्यांना आणि इतर कैक वाहनांना तुच्छतेनें लेखणारा 'बेरड पुणेरी पठ्या' होता, मित्रांमध्यें 'कवि' होता; आणि आजूबाजूच्या उपवर वधूंना 'बागुलबुवा' होता. अशा तऱ्हेचें हें मिश्र रंगांचें इंद्रधनुष्य होतें. आकाशांत ढग आले म्हणजे इंद्रधनुष्याचें दर्शन घडतें, त्याप्रमाणें दरवर्षी वसंतऋतु आला, पानांना हिरवा रंग चढला, आणि मोगऱ्यांचे ताटवे सुवासानें दरवळूं लागले, कीं वर सांगितलेले सर्व गुण त्यांच्या अंगांत कमीअधिक प्रमाणांत दृग्गोचर होऊं लागत. फरक एवढाच, कीं इंद्रधनुष्य फार टिकणारें नसतें आणि निळूभाऊंवर या गुणांचा ताबा तीसन् तीस–साठ दिवस टिकून असे!

यंदाच्या वर्षी एके दिवशीं सकाळीं निळूभाऊ निजून उठले, आणि खिडकींतून वांकून पाहूं लागले तों– समोरच्या घरांत त्यांना पांडुरंग दिसला.

वर्षभर घोरत पडलेलें त्यांचें कविहृदय अभंगांच्या ओळी आठवूं लागलें. सिंधूवर त्यांचें प्रेम बसलें— म्हणजे गवळयाच्या कानटोपीसारखें घट्ट चिकटलें. त्यांच्याच भाषेंत सांगावयाचें म्हटलें म्हणजे, "ताट मी काढीन। शेज मी झाडीन। चरणसंवाहन। मीच करी॥" इतकें त्यांचें चिकट प्रेम होतें.

पण एका हातानें टाळी वाजत नसते. वाणी दुकान घालवयास तयार असून काय उपयोग? सौदा पटवायला गिऱ्हाइक आलें तरच फायदा! प्रेमाचें अगदीं असेंच कुलंगडें आहे! वयांत आलेला प्रत्येक तरुण प्रेम करायला एका 'इश्श'ला तयार असतो, पण मौज ही, कीं 'इश्श'वालीच लवकर सापडत नाहीं. आजपर्यंतच्या प्रवासांत निळूभाऊंनीं एका मुलीच्या तोंडून एकदांच 'इश्श' ऐकलें आणि त्याच दिवशीं त्यांनीं घरीं येऊन चार गद्यकाव्यें ( म्हणजे काय कुणाला ठाऊक! ) लिहून काढलीं. चारपानें अभंग ( अर्थात् तुकारामाचे थोडा फेर करून ) रचले. त्या दिवशीं त्यांनीं दिवाळीदसरा साजरा केला, पण तें प्रकरण लवकरच निकालांत निघालें आणि—

सदरहू सिंधूप्रकरण नुकतेंच क्षितिजावर आलें होतें. तपासांतीं असेंहि कळून आलें, कीं मुलीच्या शिक्षणाकरतां म्हणून पेन्शनर अण्णासाहेब मुद्दाम पुण्याला नुक्तेच येऊन राहिले आहेत. मुलीला शिक्षणाकरितां म्हणून पुण्याला आणणें योग्य! परंतु या म्हातारबुवांना नाशिक क्षेत्र फार लांब आहे? यांना पुण्यांत राहण्याची काय जरूरी? पण नाहीं. म्हातारीं माणसें म्हणजे सुंदरशा आळवाच्या भाजींतील चोरटे खडे. स्वतः शिजावयाचे नाहींत, अन् दुसऱ्याला भाजी खाऊं द्यावयाचे नाहींत. निळूभाऊंना सिंधूकडे पाहिलें कीं, 'युगा ऐसें पळ तुजविण जाय। पाहतेसी काय अंत माझा॥' असें होऊन जाई, तर अण्णासाहेबांच्या पेन्शनरी देहयष्टीकडे पाहिलें कीं, 'न करवे धंदा। आइता तोंडीं पडे लोंदा। जीवंताचि मेले। लाजा वाटूनीया प्याले॥' असे चिडून उद्गार काढावेसें वाटूं लागे.

एके दिवशीं कांहीं कारण नसतांना उगाच त्यांनीं कॉलेजवर जाऊन पाहिलें. तपासा अंतीं असेंहि कळून आलें कीं, मुलगी पहिल्या वर्षाच्या वर्गांत आहे. निळूभाऊंना आतां मात्र धीर धरवेना. पण करणार काय? कॉलेजांतून त्यांचा शिरकाव होणें आतां शक्य नव्हतें. बरें, वकिलीचा अभ्यास सोडून

एम्. ए. च्या टर्म्स भरतों म्हणावें, तर जामदग्न्योत्पन्न अशा बंधुराजाशीं दोन दिवस शाब्दिक कुस्त्या! इतकेंहि करून पाहण्याचें त्यांच्या मनांत आलें होतें. परंतु तो प्रसंग अनायासें टळला.

विनू आणि निळूभाऊ हे एक दही-मिसळ प्लेट दोघांनीं वांटून खाण्याइतके जानी दोस्त होते. सुरुवातीलाच सांगितलेल्या मित्रद्वयाच्या संभाषण-प्रसंगाला चार दोन दिवस उलटले असतील नसतील, इतक्यांत एक अचानक प्रसंग घडून आला. बहुतेक प्रसंगीं निळू आणि विनू हे बरोबरच बाहेर पडावयाचे. ज्याप्रमाणें काबली म्हटली म्हणजे पांढऱ्या घुगऱ्या आणि खारे शेंगदाणे, त्याप्रमाणें या दुक्कलीचें वास्तव्य बहुतेक जोडीनें असावयाचें.

त्या दिवशीं संध्याकाळीं फिरायला म्हणून ह्या स्वाऱ्या बुधवारच्या बागेंत गेल्या. निळूभाऊचें काव्यहृदय या संकेताच्या पूर्णपणें विरुद्ध होतें. फिरायला पर्वती रस्ता, स्टेशनबाजू, ती फर्ग्युसनच्या पांचवीला पुजलेली टेकडी इत्यादि नितान्त-रमणीय स्थळें असतांना विनूचें म्हणणें काय, तर "चला, आज आपण दोन पैशांचा चिवडा घेऊन बुधवारच्या बागेंत खात बसूं!" यंव रे कल्पना! भरबाजारचौकांत लिंबाचें लोणचें खात बसण्याइतकाच हा विक्षिप्त प्रकार होता.

"आपण यापुढं एक पाऊल टाकणार नाहीं." निळूभाऊ निश्चयाच्या सुरानें म्हणाले.

"मग मी तुला उचलून नेईन," विनूहि तितक्याच निश्चयाच्या सुरानें म्हणाला. निळूभाऊंनीं विनूचा हा आवेश पाहून पड खाण्याचें ठरविलें.

"हूंः! 'ढेकणाचे संगें हिरा जो भंगला। कुसंगें नाडला साधू तैसा ॥'—" इत्यादि पुटपुटत निळूभाऊंनीं बागेंत प्रवेश केला.

"वाटेल तितके महाराष्ट्रीय संतशिरोमणि माझ्या बोडक्यावर आणून आदळलेस तरी मला कांहीं बोध व्हायचा नाहीं. मी आहे नास्तिक. त्यांतून फटकळ—" विनू म्हणाला.

पुढें तो आणखी कांहीं तरी बडबडणार इतक्यांत एका चष्मेवाल्या, मफलरवाल्या, लठ्ठ लाठीवाल्या, भडभुंजी धोतरवाल्या उतारवयाच्या इसमानें त्याच्या खांद्यावर हात ठेवला.

" काय विनू—? "

" काय अण्णासाहेब ? "

" कुठं असतोस ? दादा कुठं आहेत ? "

" तुम्ही इकडे कुणीकडे ? " इत्यादि इत्यादि प्रश्नांचा धुमाकूळ झाला.

निळूभाऊंनीं डोळे मिटले, उघडले, पुन्हा मिटले, पुन्हा उघडले ! डोळ्यांचीं काचवर्तुळें हातरुमालानें साफ केलीं.

हा काय प्रकार ? हा प्रकार काय आहे ? कारण स्वतःच्या डोळ्यांवर माणसानें पूर्णपणें विश्वास ठेवावा असें जर आपण गृहीत धरून चाललों तर हे अण्णासाहेब, हे ते अण्णासाहेब, हे ते अण्णासाहेब त्या सिंधूचे वडील. सिंधूचा हा शरीररक्षक ! – हाच तो तिच्या पाठोपाठ हिंडणारा वस्ताद. – आणि विनू याला अगदीं—? छेः ! छेः ! छेः ! डोक्यांत विचाराला जागाच नाहीं. निळू-भाऊंनीं छातीवर हात ठेवून पाहिलें. नाहीं, तसें म्हणावें तर तसेंहि नाहीं; अगदीं पुरतेपणीं इहलोक आहे.

हवापाण्याचे, नात्यागोत्याचे प्रश्न संपल्यावर अण्णासाहेबांनीं सहजच " इकडे कुणीकडे ? तुम्ही तरुण मंडळी कुठल्या तरी टेकडीवर किंवा एखाद्या झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्यापाशीं—" म्हणूनं म्हटलें.

" चालायचंच. पण आम्ही आतां तरुण असलों, तरी जगल्यावांचल्यास उद्यां वरुण होणारच; म्हणून आपल्या मावळत्या अमदानींत बुधवारची बाग लागेल, या हिशोबानें आज आपली उगीच तपासणी केली—" विनू हसून म्हणाला.

" आणि हे कोण बरोबर तुझ्या ? आमच्या घरासमोरच—" अण्णासाहेब म्हणाले.

" हो, तुमच्या घरासमोरच मी राहतों. माझं नांव नीलकंठ. यंदाच बी. ए. झालों—" निळूभाऊ घसा साफ करीत म्हणाले.

" अरे विनू, ये कीं यांना घेऊन आमच्या घरीं एकदां. शिंदीलाहि ( सिंधूलाहि ) तूं आलास म्हणजे बोलाय-चालायला तेवढंच एक ओळखीचं माणूस—" अण्णासाहेब म्हणाले.

आतां यापुढचा महत्त्वाचा प्रसंग म्हटला म्हणजे सुमारें दोन महिन्यां-नंतरचा. निळूभाऊ आतां एक तासाआड समोरच्या घरांत मनानें अगर शरीरानें जाऊं-येऊं लागले होते. विनूचा उपयोग त्यांना फक्त प्रथम-भेटी-पुरताच होता. आतां विनूची गाडी सायडिंगवर टाकून ते आपली गाडी खुशाल राजरस्त्यानें काढीत होते.

आणि एके दिवशीं त्यांनीं कुणालाहि न कळवितां एक गद्य काव्य लिहिलें. एका सुंदरशा लिफाफ्यांत तें काव्य बंद करून त्यांनीं तें स्वहस्तानें आजूबाजूला कोणी नाहीं असें पाहून हळूच सिंधूला तें कसें काय जमलें आहे तें पाहण्यास दिलें.

॥ ३ ॥

दुसऱ्या दिवशीं सकाळच्या सूर्यनारायणानें पृथ्वीच्या पाठीवर बऱ्याचशा गमती पाहिल्या !

"यमू, तूं एकदां तें गद्यकाव्य वाच, म्हणजे मी म्हणतें तें खरं आहे कीं नाहीं याची साक्ष तुला आपोआप पटेल." सिंधू किंचित् क्रोधाविर्भावानें म्हणाली.

"इश्शऽ! अशा माकडचेष्टांना साक्षीपुरावे कशाला गोळा करायला पाहिजेत? वयांत आलेला कोणताहि तरुण उकीरडा हुंगल्याशिवाय कसा राहील? तरी पण मला एकदां या वाङ्मयभक्ताची कृति पाहूं दे—दे पाहूं तें तुझं गद्यकाव्य?"

"प्रीतिदेवतेस—

आकाशांत दोनच तारे चमकत होते. पृथ्वीवर रात्रीची राणी बहरली होती. सुगंधी वारा हलके हलके वाहत होता. मी एकटाच एका नदीच्या कांठीं बसलों होतों. मी तुझ्या नांवाची स्मरणी ओढीत होतों. हास—एकदां हास—एकदांच हास. मला वाटतं तूं पौर्णिमेची रात्र आहेस—नव्हे पौर्णिमेचा चंद्र आहेस. मी तुझा प्रकाश आहे. मला वाटतं रोज तुझ्या वेणींत मीं आपल्या हातानं फुलं खोवावींत. मला वाटतं मीं रोज तुझी वाट पाहत बसावं. मला वाटतं माझं तुझ्यावर प्रेम

आहे हें सांगणं म्हणजे सूर्य पूर्वेला उगवतो असंच सांगण्यासारखं नाहीं का? किंवा बटाट्यांमध्यें स्टार्च असतो असंच सांगण्यासारखं नाहीं का? शंभर नंबरी सोन्याविषयीं कोण शंका घेईल बरं? मग सांग–अगदीं उघड, उघड–खरंखरंच सांग– तूं माझी होशील का? मी तुझा होईन का? होईन का मी तुझा? होशील का तूं माझी?"

काव्य वाचल्यावर यमू मोठ्यानें हसतच सुटली.

"काय ग ए सिंधिटले, ए सिंधप्रांता, होशील का तूं माझा? का अजून मुंबई प्रांतापासून विभक्तच होण्याचा तुझा विचार आहे?" पुन्हा यमूनें हसण्यास प्रारंभ केला.

"यमू, तुला हसूं तरी कसं येतं बाई देव जाणे! अग, हा शुद्ध—" सिंधू म्हणाली.

"अग तें सगळं खरं, पण हसूं आवरतच नाहीं त्याला काय करूं?" यमू म्हणाली.

"मी हें काव्य अण्णांना दाखवणार आहे." सिंधू निश्चयाच्या सुरांत म्हणाली.

"हाऽ वेडाबाई! मग त्यांत काय मौज? फार झालं तर एक दिवस अण्णा त्याला रागं भरतील, अन् पुन्हा तो चघळपणा करायला येणार नाहीं असं करतील. त्यांत नाहीं मजा. मी सांगतें तसं कर—" यमू म्हणाली.

"म्हणजे काय करूं? त्याच्यापुढं निरांजन ओवाळूं, का त्याला धूप-दीप-नैवेद्य दाखवूं? का त्याला एक सोनेरी देवघर आणूं?" सिंधू म्हणाली.

"त्याला देवघर नाहीं मिळायचं. पण कांहीं दिवस त्याला थोडा शेंदूर फासूं. गडी औट गेला म्हणजे ज्याप्रमाणं म्हसोबाला खेटरांची पूजा बांधतात; त्याप्रमाणं स्वारी रोजच्या रोज काव्यांचा ढिगारा आणून ओतूं लागली, तर एके दिवशीं पाहूं काय करायचं तें. अण्णांना ह्यांतलं एक अक्षर नाहीं सांगायचं. आतां मीं सांगतें त्याप्रमाणं तूं एक गद्यकाव्य लिही."

"इश्शऽ!" सिन्धूनें हसत हसत यमूच्या पाठीवर थापटी मारली.

"वर नांव दे—'प्रेमरोग्यास'– आतां खालीं लिही—"

सिंधूनें हसत हसत कागद-पेन्सिल घेऊन लिहिण्यास सुरुवात केली.

" इस्पितळांत दोनच दिवे होते. पृथ्वीवर वेड्यांचं पीक आलं होतं. फिनेल्चा सुगंध जिकडे तिकडे दरवळला होता. मी एकटीच एका कॉटवर बसलें होतें, आणि तुझ्या नांवाचा उद्धार करीत होतें. तूं पुन्हा ये तर खरा. एकदां—एकदांच ये. मला वाटतं तूं फार लोचट आहेस. तुला एकदां काठी मारली, दोनदां, तीनदां तोच प्रयोग केला. तूं पुन्हा दरवाजांत उभाच ! मला वाटतं तूं निर्लज्ज आहेस. मला वाटतं तूं लतकोडगा आहेस. मला वाटतं तुला—पण जाऊं दे. बोलूनचालून तूं कुत्रा आहेस. इस्पितळांतील रोग्यांच्या डब्यांतील पोळया पळवणं हा तुझा धर्मच आहे. मग सांग—आतां खरं सांग—या खेपेला तुला मीं होऊन एक पोळीचा तुकडा दिलेला आहे—आतां उघड उघड सांग—पुन्हा नाहीं ना वेळीं-अवेळीं भुंकणार ? "

" इश्श ऽ ! नको गडे—" सिंधूनें कागदाचा चोळामोळा केला.

" कां बरं गडे ? इतका पुळका असेल तर मग त्याला 'हो' म्हण म्हणजे पुन्हा त्रास नको. चल, आण तें माझं काव्य—" यमूनें तो कागद हिसकावून घेतला.

" ए, पण—" म्हणून म्हणत सिंधू तो कागद घेण्यासाठीं धडपडूं लागली.

" ऊंऽहूं—तो कागद नाहीं मिळणार. तुला इतकं मनाला लावून घेण्यासारखं त्यांत काय आहे ? उत्तरेचे टागोर उत्तरेला. गोदावरीच्या दक्षिणेचे आम्ही टागोर आहोंत. हें आमचं मंजुगुंजन. त्यांत काय बिघडलं ? " यमू म्हणाली.

" अग, पण एकदम इतकं एखाद्याला हिणवायचं—" सिंधू म्हणाली.

" अखेरीला तूं जातीवर गेलीसच. सिंधू, तुला मी सांगतें, कीं या मुलांना—या गद्धेमल्हारांना दया दाखवणं शहाणपणाचं नाहीं. तुझी काय कल्पना आहे ? तुला पुरुषजात ही आपल्यासारखी वाटते का ? अग नाहीं, नाहीं, त्रिवार नाहीं ! नांगी वर करून चालणाऱ्या विंचवाला जोड्याचाच खाऊ दिला पाहिजे. हीं मुलं कॉलेजांत येतात, तीं शिकण्याकरतां नाहींच ! तर तुझ्यासारख्या सरळहृदयाच्या मुलींशीं लघळपणा करायला, समजलीस ? मी

कुठल्याहि तरुणावर विश्वास टाकायला तयार नाहीं. तुला एकच गद्यकाव्य-रूपी चावटपणा पाहायला मिळाला तर मला आजपर्यंत कित्येक नाट्यछटा, अभंग, सुनीतं, लघुकथा– हजारों तऱ्हेचे वाङ्मयप्रकार पाहायला मिळाले आहेत!"

"मग तो विचारायला आल्यावर मी काय सांगूं?" सिंधूनें प्रश्न केला.

"तो आल्यावर म्हणावं तुमचं काव्य वाचलं. अप्रतिम आहे, निनान्त-रमणीय आहे. वाचतांना मनाला हेलकावे बसतात. कांहीं वेळेला प्रेमाची भरती येते, कांहीं वेळेला दया उत्पन्न होते, कांहीं वेळेला क्रोध येतो, कांहीं वेळेला शांतरस उत्पन्न होतो. परंतु विनोद मात्र अव्वलपासून तों थेटपर्यंत बहारीचा साधला आहे. आणि नंतर आपलं चिठोरं पुढं कर अन् म्हणावं हा माझा प्रथम-प्रयत्न आहे. आपण या प्रांतांतले तज्ज्ञ आहांत. आपण आपल्या अधिकारी वाणीनं यावर अभिप्राय द्यावा अशी विनंति आहे. क. लो. अ. हे वि.—इत्यादि" यमू हसत हसत म्हणाली.

"आणि तो तें वाचून रागावला तर?" साशंकित स्वरानें सिंधू म्हणाली.

"दोन झुरके तपकिरीचे जास्त मारील. याच्यापेक्षां जास्त तो काय रडणार? अग, हल्लीं प्रेमाचं हें असंच झालं आहे. कागद, टाक आणि दौत ह्या गोष्टी फार स्वस्त आहेत, म्हणून जो बावळा उठतो तो काव्यं प्रसवतो. पुरुषांच्या प्रेमाच्या गोष्टी नेहमीं वाचाव्यात, ऐकाव्यात, पाहाव्यात, पण त्यांनीं आपल्या-वर नेम धरला, कीं 'आस्ते कदम, महाराज! पुढं येऊं नका.' आलं लक्षांत? मीं तर ठरवलं आहे कीं, या जन्मांत पुरुषांचासंपर्क नको–" यमू म्हणाली.

"अन् घरधनींची काय वाट?" सिन्धू हसत म्हणाली.

"आपण कुणाचीच घरधनीण होणार नाहीं." यमू आवेशानें म्हणाली.

"इश्शऽ!" सिन्धू तिच्या पदराशीं खेळत म्हणाली.

"खरंच! मी कांहीं खोटं नाहीं सांगत. जोंपर्यंत बायकांना जगांत मोकळीक नाहीं, जोंपर्यंत बायका म्हटल्या म्हणजे बायकाच त्या, अशी विचारसरणी पुरुषांच्या डोक्यांतून निघालेली—नाहींशी झालेली नाहीं, तोंपर्यंत ह्या यमूला लग्नच करायचं नाहीं." यमू आवेशानें म्हणाली.

"कोण? यमूताई का?– लग्न करणार नाहीं? पण त्यांच्याशीं लग्न लावायला कोण तयार होईल? नवऱ्याला दिवसांतून तीनदा जुन्या बाजारांत फुंकतील त्या." विनूचें हें भाषण ऐकल्याबरोबर दोघीजणी चपापल्या. काव्याच्या कागदाची लपवालपव सुरू झाली.

"यमूताई, तुमचं सांद्यत भाषण मीं ऐकलं नाहीं, पण शेवटच्या भागावरून एवढं मात्र सांगतों, कीं तुम्ही लग्न करणार. एवढंच नाहीं तर तुम्ही नवऱ्याच्या हातांतलं जपानी बाहुलं म्हणून राहाल." विनू हसत म्हणाला.

"मुळींच नाहीं—" यमू जोरानें म्हणाली.

"तेलांत टाकलेली मोहरी प्रथम फार तडतड करते, नंतर ती त्याच्याशीं समरस होते; एवढंच काय पण आपला पूर्वीचा रंगसुद्धां टाकते!"

"उगीच वाद कशाला? पाहूंच कीं आपण—" सिन्धू मध्येंच म्हणाली.

"पाहूंच!" यमू म्हणाली.

॥ ४ ॥

तो बोलपट मुंबईला आल्यापासून मंडळींनीं ठरविलें होतें, कीं पुण्याला अगदीं पहिल्या खेळाला पहिल्या दिवशीं जायचें.

परंतु अगदीं ऐन वेळेला विनूचा पत्ता नव्हता, यमू येईल कीं नाहीं याची खात्री नव्हती, आणि अण्णासाहेब कुठल्याशा साहेबांकडे दुपारीं गेले होते. आशा सुटेना आणि साहेब भेटेना म्हणूनच कीं काय अजून ते परतले नव्हते. सिंधू तर अगदीं चिढून गेली होती. दीडशें वर्षें साहेबांच्या संगतींत जन्म काढणाऱ्या या हिंदुस्थानला म्हणावं तरी काय? अजून त्याला :ही असली सुस्ती सोडतां येऊं नये काय? निळूराया तर एक तास सव्वादोन मिनिटें आधीं हजर होते.

बराच वेळ सिंधूनें खिडकीच्या कडीशीं खेळून पाहिलें. जसजशी वेळ भरत आली तसतशी खिडकीची कडी जास्त जास्त अस्वस्थ होऊं लागली!

"जाऊं द्या झालं. नाहीं येत मंडळी तर आपण जाऊं झालं." निळूभाऊ म्हणाले. सिन्धूला सिनेमा तर पाहिजे होता, परंतु शेजारीं हें चित्र नको होतें. शेवटीं बराच वेळ वाट पाहून तिनें होकार दिला.

थिएटरमध्यें विशेष गर्दी नव्हती; परंतु निळूभाऊंनीं मुद्दामच जरा अव्वल दर्जाचें तिकिट काढलें. स्थानापन्न झाल्यावर निळूभाऊंनीं हळूच म्हटलें— " मनुष्याला सिनेमा पाहण्यांत आनंद वाटतो– पण विशेषतः बरोबर दुसरं कुणी असलं म्हणजे दुधांत साखर—"

" साहजिकच आहे. खुर्च्यांतले ढेकूण दोघांत वांटले जातात." सिन्धू म्हणाली. निळूभाऊंनीं तीन मजली हास्याचे फवारे सोडले!

" कांहीं म्हणा, परंतु तुमचा विनोद कांहीं और आहे! जणूं काय गरम गरम चाई अन् उस्के साथ थोडी खारी बिस्कीट. 'रुची नेदी अन्न। त्यांत नसतां लवण ॥' विनोदाशिवाय भाषणाला गम्मत नाहीं, मजा नाहीं, अन्... नाहींच नाहीं." निळूभाऊ चष्म्याला कुरवाळीत म्हणाले.

" तुमचा तुकारामबुवांचा अभ्यास एखाद्या वारकऱ्यालासुद्धां तोंडांत बोटं घालायला लावील." कांहीं तरी बोलावें म्हणून सिन्धू म्हणाली. निळूभाऊ यावर कांहीं तरी उत्तर करणार, इतक्यांत बोलपटाचें बोलणें सुरू झालें. जरा वेळानें पुन्हा निळूभाऊंनीं उचल खाल्ली, " तुमचं परवांचं काव्य मीं वाचलं."

सिन्धूनें नुसतें 'हूं' म्हटलें.

" भाषा अजून पुष्कळच-कमावली पाहिजे. प्रथम प्रयत्न म्हणून स्तुत्य आहे. मात्र तुमची ही Satire तुम्हीं थोडी कमी केली पाहिजे. तुमचं काव्य वाचून मला शॉची आठवण झाली."

" इश्शऽ!"

" इश्श नाहीं. खरंच." निळूभाऊ अवसानानें बोलूं लागले. " आपल्या इकडच्या स्त्रिया किती कर्तबगार आहेत याची फारच थोड्यांना जाणीव आहे. स्त्री म्हणजे चूल, मूल, फूल यांपलीकडे कुचकामाची असं फारजणांना वाटतं. पण माझी समजूत—नव्हे खात्री आहे, कीं स्त्रिया ह्या अतुलबल आहेत. स्त्रिया ह्या निद्रिस्त नदीप्रमाणें आहेत. वरची वाळू दूर केली कीं आंत अमृताचे कुंभ! एवढंच कीं, त्यांना कुणी तरी मार्गदर्शक पाहिजे. नाहीं तरी मी म्हणतों, गुरूशिवाय पुरुषांना तरी काय ज्ञानप्राप्ति होणार आहे?"

इतक्यांत एक भाग संपला आणि पाठीमागून यमू आणि विनू हसत हसत पुढें आली. निळूभाऊंना विनूचें आगमन तितकेंसें रुचलें नाहीं.

" यमूताई, आमचा निळूराया बघितलास? कसा पंडित आहे तो बघ. अन् तूं म्हणतेस पुरुष अप्पलपोटे, स्वार्थी, लुच्चे आहेत. बघ, हा बघ मेरुचिंतामणि– तुम्हां बायकाचा वकील." विनू सिन्धूशेजारीं येऊन बसत म्हणाला.

" आणि सिन्धू, चांगली वाट पाहिलीस हो आमची." यमू म्हणाली.

" अग, ती रोज नाहीं का आपली वाट पाहत ? वाटेकडे पाहायचं अन् आपली वाट चालूं लागायचं ! " विनू हसत म्हणाला.

" म्हणजे पहा हो." सिन्धू किंचित् क्रोधाविर्भावानें म्हणाली.

" जाऊं दे. आम्ही कांहीं पाहत नाहीं. चूक माझी आहे. पण त्याला कारण हें, कीं मी इकडे यायच्या सुमाराला माझे जन्मदाते एकाएकीं माझ्यासमोर येऊन उभे राहिले आणि एकदम ओरडून म्हणाले, " विन्या, लग्न करतोस कीं नाहीं ? "

" इश्श ! " सिन्धू किंचित् लाजून ( हो लाजूनच ! ) म्हणाली.

" तेव्हां मीं म्हटलं, 'हो, करतों; पण आतांच येऊं का ?' नंतर मी सिनेमाला जाण्याच्या तयारींत आहे असं कळतांच पुन्हा एकदा ते अखिल भारतीय युवकावर घसरले. तेव्हां तुझं नांव पुढं करून निघून आलों. वाटेंत ही जगदंबा माउली भेटली. तिलाहि घेऊन आलों." विनू म्हणाला.

" पण तुमचे वडील असं काय म्हणाले ? " सिंधू म्हणाली.

" निळूराया—'थिएटरमध्यें विडी ओढण्याची सक्त मनाई आहे' असं बजावणाऱ्या पाटीशेजारीं खासगी बोलण्याची मनाई आहे असं सांगणारी एखादी पाटी लावली तर बरं पडेल नाहीं ? " विनू म्हणाला.

" म्हणजे आम्हांला लाडू मिळणार लवकर तर ? " यमू म्हणाली.

" शिव-शिव ! मला त्या बिचारीची कींव येते आहे. विनू, तुझ्यासारख्या नतद्रष्टाच्या हातांत कोणतं रत्न येऊन पडणार असेल, त्याला इहलोकीं सुखाची आशाच नको ! " निळूभाऊ सद्गदित स्वरानें म्हणाले.

" म्हणजे ? कसायाच्या हातांत गाय पडणार कीं काय ? " सिंधूनें आश्चर्यानें प्रश्न केला.

" वाः ! म्हणजे तुम्हांला कुणालाच माझा अरेरावी स्वभाव माहीत नाहीं वाटतं ? आमच्या निळूभाऊंना विचारा. नवपरिणीत वधूला मी एका झाडाशीं बांधून ठेवणार आहे. तीन दिवस उपास करायला लावणार, अन् हातांत बैलाचा आसूड घेऊन विचारणार म्हणजे खेकसणार, 'काय ? बच्चंजी, कांहीं समता, समान हक्क वगैरे भुतं गेलीं का नाहीं डोक्यांतून ? ' अगदीं हा फर्मा !" विनू निळूभाऊंकडे पाहून म्हणाला.

" सोनियाचें ताट क्षीरीनें भरीलें ।
भक्षावया दिलें श्वानालागीं ॥ " निळूभाऊ म्हणाले.

" विनायकराव, पुरे बरं का ! पुरे. म्हटलं उगीच कां तोंडाची वाफ दवडतां ? " यमू म्हणाली.

" म्हणजे ? यांची धर्मपत्नी होणारीचं कर्मच ओढवलं म्हणायचं ! " सिन्धू म्हणाली.

" अग हा पुरुषी थाट आहे. निव्वळ पोकळपणा ! याचं काय तूं ऐकते आहेस. लग्न झाल्यावर एक वर्षभर घराच्या बाहेरचीं माणसंसुद्धा विसरून जातील हे. जर एखादे वेळीं चूकून बाहेर पडलेच तर वाटेंतल्या विजेच्या खांबालाच विचारतील, 'काय केली विठाबाई ?' " यमू हसून म्हणाली.

निळूभाऊंची निराशा झाली होती. दैवानें ही संधि मिळवून दिली होती परंतु विनूनें घोटाळा केला. त्यांनीं 'पुरुषांचें चुकतें कोठें ? ' या महत्त्वाच्या विषयावर यमूशीं बोलण्यास सुरुवात केली. विनूनें हळूच सिन्धूचा हात धरला. सिन्धूनें चपापून त्याच्याकडे पाहिलें.

" अण्णा आज आमच्याकडे आले होते. आमच्या घरीं आज तुझ्या लग्नाचा प्रश्न निघाला होता— " विनू म्हणाला.

" मला लग्नच करायचं नाहीं. मी अण्णांना स्पष्ट सांगणार आहें." सिन्धूनें हात सोडवून घेत म्हटलें.

" माझ्याशींसुद्धां नाहीं ? " विनूनें हसत म्हटलें.

सिन्धूला एकदम कसेंसेंच झालें. आकाशांत दोनच तारे चमकत होते, हें वाक्य तिच्या डोळ्यांपुढें थैमान घालूं लागलें. आकाशांत एकच तारा कां चमकूं नये ?

"काय, मी काय म्हणतों आहे?" विनूनें हलकेंच विचारलें.

"अंऽहं—" सिन्धूनें मान फिरवली.

सर्वजण आतां समोरचा बोलपट ऐकूं, पाहूं लागले.

॥ ५ ॥

दिवाळीच्या सुटींत लोणावळ्याच्या आसपास वाढणाऱ्या डेरेदार वृक्षराजींच्या गर्द छायेंत, एका मळक्याशा धोंड्यावर एक मोठा रमणीय देखावा दिसत होता. वेळ सायंकाळची होती. (कारण, मोठीं माणसें दुपारीं सहसा बाहेर पडत नाहींत!) वारा वाहत होता (कारण त्याला दुसरा कांहींच उद्योग नसतो.) झऱ्याचें पाणी शेजारून जाणाऱ्या रोजच्या डेक्कन क्वीनशीं स्पर्धा करण्याचें अवसान आणीत होतें. आणि पक्षिगण—म्हणजे धोंड्यावर बसलेले ते दोन पक्षी आपसाआपसांत कांहीं तरी किलबिल करीत होते.

"मग सिन्धू, आहे तुझी तयारी?" पहिला पक्षी म्हणतो.

"चला, अंधार पडूं लागला—" दुसरा उत्तर करतो.

"सिन्धू, माझ्या हृदयांत पडलेल्या अंधारापेक्षां हा बाहेरचा अंधार कांहीं विशेष जाणवणारा नाहीं. 'विरोधाचें मज न साहे वचन। बहु होतें मन कासावीस ॥' तूं एकदां हो म्हण.—या वद्य पक्षांतसुद्धां पृथ्वीवर रोज पौर्णिमेचा चांदोबा झळकूं लागेल." निळूभाऊ म्हणाले.

"पण मी तुम्हांला—" सिन्धू म्हणूं लागली.

"छेः! छेः! मला एकदां माझं हृदय मोकळं करूं दे. ऐक—

'सर्व भावें आलों तुजसी शरण। तुजवीण वारी कोण, सिंधू ॥
तुझा आहें दास अससी तूं धनी। रेलांत बसूनी आलों मागें ॥
याजसाठीं केला होता अट्टाहास। शेवटींचा दीस गोड व्हावा ॥
रात्रंदिवस तुज आठवोनि राहें। पाहतेसी काय सत्त्व माझें ॥
निळू म्हणे किती येऊं काकुळती। कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी।

सिन्धू, हें अभंगपंचक ऐकून तरी तुला माझी दया येऊं दे!" निळूभाऊंनीं

उदासपणें आपल्या शुष्क ओठांवरून ओलाव्याकरितां जिभेचा रूळ सावकाश फिरवीत म्हटलें.

" चला, अंधार पुष्कळच पडला–" सिन्धू म्हणाली.

दुसऱ्या दिवशीं अगदीं याच वेळीं, याच ठिकाणीं आणि याच निसर्ग-देवतेच्यासमक्ष अगदीं असाच एक दुसरा प्रसंग घडून आला. मात्र आज दुसरा एक पक्षी नवीनच होता.

" सिन्धू, मला वाटलं होतं, कीं लोणावळं फार चांगलं स्थळ आहे. या ठिकाणीं किती तरी पक्षी येतात, कुठल्या तरी डहाळीवर बसतात, एकमेकांशीं 'कुहूं, कुहूं' करतात, अन् जोड्यानं परत आपल्या घरट्याकडे जातात. लोणावळं अशक्तांना सशक्त बनवण्याकरतां प्रसिद्ध आहे. पण इथल्या गार हवेनं तुझं हृदय जास्तच गार झालं कीं काय, अशी मला शंका येऊं लागली आहे. निळूभाऊ, मी, असे आम्ही दोघे प्रेमाचे धगधगीत निखारे सारखे फुंकर मारमारून प्रज्वालित करीत आहों. पण त्याची झळ तुला न लागतां आम्हांलाच मदनाप्रमाणं जाळूं लागली आहे. मग काय—?" विनू म्हणत होता.

" चला, अंधार पडूं लागला नाहीं—" सिन्धू म्हणत होती.

" नाहीं. माझ्यापुढं लख्ख प्रकाश पडूं लागला आहे. आणि त्या प्रकाशाला साक्ष ठेवून तुझ्याशींच विवाह करण्याची मी प्रतिज्ञा करीत आहें—"

" मी खरं सांगू का?" सिन्धू म्हणाली.

" खरं सांग अन् खोटंहि सांग." विनू म्हणाला.

" मला लग्न करायचं नाहीं---!"

" हॅत्तेरे! एवढंच? मला वाटलं आणखी काय कुणास ठाऊक!"

" खरंच!—" सिन्धू म्हणूं लागली.

" मग मी कुठं खोटं म्हणतों आहे? त्याचीं कारणंसुद्धां मी सांगूं शकेन. त्या बाबतींत यमू माझा खास बातमीदार आहे."

" काय ढालगज आहे—"

" जाऊं दे. गैरहजर असलेल्या माणसांना शिव्या देणं पाप आहे. लग्न केलं म्हणजे स्वातंत्र्य जातं—एक कारण. लग्न झालं म्हणजे आत्मोन्नति होत नाहीं—दुसरं कारण. दुसऱ्याच्या कह्यांत वागावं लागतं—कारण नंबर तीन. —पण खरं पाहिलं तर पहिल्या कारणांतला 'अ' विभाग, वगैरे वगैरे. इत्यादि इत्यादि. पुन्हा वर पुरुषांची जात अशी आहे—पुरुषांची जात तशी आहे—म्हणजे पुरुषांच्या जातीला दोन दोन शिंगं असतात कीं काय हरि जाणे! " विनू म्हणाला.

" चला, बराच अंधार पडला—" सिन्धू म्हणाली.

" हो खरंच, तुला कंटाळा आला असेल नाहीं का? आणि म्हणूनच हा अंधार फार घाई करूं लागला बरं का! " दोघेंहि उठून रस्ता चालूं लागलीं.

* * *

हातांत पत्र तसेंच ठेवून सिन्धू आपल्याशींच विचार करीत होती. सुटी सुरू झाल्यावर अण्णांनीं लोणावळ्याला विनूच्या घरीं चार दिवस जाऊन राहण्याचा निश्चय जाहीर केला—कां? आपण त्या निश्चयाला होकार दिला. बरें केलें कीं वाईट? यमू सुटींत लगबगीनें धारवाडला आपल्या मामाकडे निघून गेली. आपल्याबरोबर लोणावळ्यास येण्याचें तिनें स्पष्ट नाकारलें— कां? निळूभाऊ ( तुकारामबुवा ) आपल्या पाठोपाठ आले— कां? अलीकडे अण्णा आपल्याबरोबर फिरावयास येण्याचें टाळतात,—कां?

पोस्टाच्या पत्रावर विश्वास ठेवावा का? आपण लिहितों तीं पत्रें अगदीं अक्षरन् अक्षर तशींच इच्छित स्थळीं जातात का? का त्यांत कांहीं फेरबदल होणें शक्य आहे—?

सिन्धूनें उगवत्या सूर्याकडे पाहिलें आणि हातांतील पत्राकडे पाहिलें व चवथ्यांदा पत्राची आवृत्ति करण्यास सुरुवात केली.

" प्रिय मैत्रीण सिन्धूताई,

येत्या मार्गशीर्ष महिन्यांत मी एका हतभागी M. A., LL. B. तरुणाला डाळ, तांदूळ, पीठ, मीठ हक्कानं आणायला सांगणार आहे. सदरहू समारंभाला तुला रीतसर बोलावणं येईलच आणि तूं ( जर

मोकळी असशील तर ) अवश्य यावंस अशी माझी विनंति आहे. मी आपण होऊन कबूल झालें. मजवर कोणीहि जुलूम-जबरदस्ती केली नाहीं. तुला सकृद्दर्शनीं ' यमू आणि विवाह ' हें एक कोडेंवजा शीर्षक वाटेल. पण हा आभास आहे. माझं ऐकून घे.

सध्यांच्या जीवनकलहांत ज्याप्रमाणं 'ब्राह्मण नाहीं' हें एक qualification समजलं जातं, त्याप्रमाणें 'पुरुष नाहीं—बाई आहे' हें एक प्रशस्तिपत्र आहे आणि नशिबानं आपण सुदैवाच्या ठरलों आहोंत. बी. ए. फी. ए. होऊन पुरुषांना नोकरी मिळतेच असें नाहीं; पण आपणा बायकांना मात्र कॉलेजांत एकदोन वर्षं काढलीं, कीं २५० रु. मिळवणारं गाढव अजून सहज गांठतां येतं. हीच आपली नोकरी. स्वातंत्र्य वगैरे गप्पा ठीक असतात; पण स्वातंत्र्याची फी फार दांडगी आहे. जन्मभर बेगमपणा पत्करावा लागतो. त्यांतून सर्वच पुरुष तिस्मारखान असतात असं नाहीं. बहुतेक 'होय ग'च असतात. फक्त कुठं लगाम ओढायचा आणि कुठं मोकळा सोडायचा हें ज्ञान त्या बाईला असलं, कीं मिय्याराणी चले है. मी तुझ्यापाशीं स्त्रियांच्या वतीनं फार फार भांडत होतें. परंतु आमच्या M. A., LL. B. नं माझं मत पार बदलून टाकलं आहे. माझ्या उपदेशाचा तुझ्यावर जर कांहीं परिणाम झाला असेल तर तें सर्व कांहीं विसर. स्त्रियांची थोरवी कितीहि मोठी असली तरी स्त्रिया ह्या पुरुषांच्या छाया होत हेंच खरं आहे. आतां एवढंच, कीं पुरुषांना आपण ही अंदरकी बात कधींच कळूं देतां कामा नये. नाहीं तर आजचीं हीं सुतं उद्यां भुतं होतील. आपण आपलं नेहमीं ओरडा करीत राहिलंच पाहिजे.

आतां पत्र फारच लांबलं आहे. पुरं करतें.

खरंच तुझा तो देहूवाणी काय म्हणतो आहे ? अजून एकतारी हातांत आहे का ? देहूवाण्यापेक्षां मला वाटतं विनायकराव—इश्शऽ ! मला काय करायचं आहे म्हणा. तो तुझा प्रांत आहे.

इतके दिवस सर्वस्वीं तुझीच ( परंतु आतां मात्र–) ?

यमू "

सिन्धू विचार करीत होती, कीं ह्या पत्राचा लेखक कोण असावा? यमू— का यमूचें भूत?

आणि देव म्हणून समजणाऱ्या या मैत्रिणीला—? यमूचें म्हणणें खरें असेल तर—? तर आपला मार्ग चुकलाच म्हणायचा.

सिन्धूनें खिडकींतून बाहेर पाहिलें— विनू हातांत एक पत्र घेऊन येत होता.

"यमूताई लवकरच सौभाग्यवती होणार— पत्र आहे त्यांचं—" विनू म्हणाला. सिन्धूनें फक्त 'हूं' म्हटलें; आणि हातांतलें पत्र घडी करून पोलक्या-च्या खिशांत ठेवलें.

"सिन्धू, आतां मात्र मला धीर निघत नाहीं. बरोबरची सर्व मंडळी एखाद्या शेंबड्याला कडेवर घेऊन 'काऊचिऊ' करीत माझ्यापुढं आली तर मी काय करूं? आतां आपणहि जरा नेट धरलाच पाहिजे—" विनू हसून म्हणाला.

"मी मात्र विवाह करणार नाहीं." सिन्धू निश्चयानें म्हणाली.

"वाः! अन् मग मी एका हातानं टाळी कशी वाजवूं? यमूनं तर ह्या पत्रांत तुझ्याकडे बोट दाखवलं आहे." विनू पत्र पुढें करून म्हणाला.

"यमूच्या शब्दाला मी काडीचीसुद्धां किंमत देत नाहीं—" सिन्धू म्हणाली.

"पण मी तिच्या शब्दाला भगवद्गीता समजतों— !"

सिन्धू कांहींच बोलली नाहीं. विनू खिडकींत जाऊन बसला.

"हें पाहा सिन्धू, लग्न न करण्याचा निश्चय आपण तरुणमंडळींनीं कधींहि करूं नये. 'कृतांतकटकामलध्वज जरा' दिसों लागलेली मंडळीसुद्धां घोड्यावर बसायला एका पायावर तयार असतात; मग आपणच कां असा त्रागा करावा? सृष्टीच्या नियमाप्रमाणं आपण कां वागूं नये? आहे ही परिस्थिति म्हणजे स्त्रियांच्या बाबतींत पुष्कळ अंशीं निराशेची आहे, हें मलासुद्धां कबूल आहे. पण मी म्हणतों, त्याला उत्तर म्हणजे 'लग्नच करणार नाहीं' हा दुराग्रह आहे. आहे ही स्थिति जोंपर्यंत पालटतां येत नाहीं, तोंपर्यंत ओरड करीत

राहावं हें मला कबूल. हें बघ, तूं रोज माझ्या कानींकपाळीं 'हक्क-हक्क अन् समता-समता' ओरडत जा—"

"आणि घसा फोडून घे—" सिन्धू म्हणाली.

"एक्स्ट्रॉ स्ट्रॉंग खात जा. त्यांत कांहीं अर्थ नाहीं. ह्या गोष्टी वादाला चांगल्या आहेत, पण व्यवहाराला विसंगत आहेत. कॉलेजमधें 'पुरुष श्रेष्ठ कीं स्त्री श्रेष्ठ' हा वाद चांगला रंगेल. पण घरामध्यें श्रेष्ठपणाचा प्रश्न उरत नाहीं, सोईचा प्रश्न निघतो. एकमेकांची सोय जाणली, कीं झाला पोपटमैनेचा जोडा तयार." विनू म्हणाला.

बराच वेळ कोणी कांहींच बोललें नाहीं.

"मग—? यमूला पत्र कोण लिहिणार? तूं कीं मी? हो, विचारलेलं बरं. नाहीं तर पुन्हा 'हक्क' म्हणून ओरडत उठशील—" विनू तिच्याकडे पाहत म्हणाला.

सिन्धूनें कांहींच उत्तर केलें नाहीं. विनूनें ओळखलें. आतां खिडकींत बसण्याची त्याला कांहींच जरूरी नव्हती.

"सिन्धू—चल, आपण जरा मोकळ्या हवेंत फिरूं या."

दोघेंहि बाहेर पडलीं.

बंगल्याच्या फाटकापाशीं निळूभाऊ एका झाडाखालीं बसून आकाशाचें निरीक्षण करीत असलेले त्यांनीं पाहिलें.

"त्या वेडप्याला आपण दिसतां उपयोगी नाहीं" असें म्हणत विनूनें सिन्धूला हाताला धरून दुसऱ्या दिशेनें चालविलें.

इकडे निळूभाऊ स्वतःशींच गुणगुणत होते—

"प्रीतीचिया बोला नाहीं पेसपाड। भलतैसें गोड करून घेई ॥
माझें मी न सोडी धन। नित्य करितों करितों कीर्तन ॥"

॥ ७ ॥

विनूची पुढची दिवाळी श्वशुरगृहीं पुण्यास झाली.

दिवाळींत एके दिवशीं कायसेंसें तो वाचीत पडला होता; आणि कोणी पाहत नाहीं असें। पाहून सिन्धू त्याच्या खोलींत शिरली.

" मी म्हणतें—"

" कां ? झाली का हक्कांची आठवण ?"

" इश्शऽ ! नेहमीं नेहमीं काय तें—"

" मग दुसरंच कांहीं तरी आहे ना ? ठीक, ऐकतों. काय—?" विनूनें पुस्तक दूर केलें.

" आपण एकदां सिनेमाला गेलों होतों—"

" एकदांच काय हजारदां गेलों असूं."

" नाहीं. मी म्हणतें तें त्या दिवशीं—मला अगदीं पहिल्याप्रथम विचारलं नाहीं का—त्या दिवशीं—"

" बरं, मग—?"

" आपण म्हणायचं होतं, कीं 'मी बायकोला अशी झाडाशीं बांधणार आहे.'"

" खरं आहे. लवकरच मी तें झाड लावणार आहे. तुला बांधण्याजोगं वाढलं म्हणजे मग—" विनू मोठ्यानें हसला.

" अन् उपाशी ठेवणार आहे."

" रोजच नाहीं का माझं जेवण होईपर्यंत उपाशी राहात तूं ?"

" मी सांगू का—? खरं म्हटलं तर तुम्हा पुरुषांच्या १०० वाक्यांतलीं १०१ वाक्यं खोटीं असतात !" सिन्धू हसत म्हणाली.

" हो ! म्हणजे खोटीं का होईनात, आम्ही १०० वाक्यं तरी बोलतों; पण मागच्या दिवाळींत एक माणूस तोंडानं नुसतं 'हो' तरी म्हणालं का ? म्हण आतां 'इश्श'." विनू म्हणाला आणि त्याच्या कल्पनेप्रमाणें सिन्धूनें 'इश्श' म्हटलेंच !

भाऊबिजेच्या दिवशीं निळूरायाला सिन्धूनें ओवाळलें. निळूभाऊंनीं बंधु-प्रेमानें प्रेरित होऊन एक चांदीची कोयरी आणि एक लठ्ठसें पुस्तक नजर केलें. ताम्हनांत पुस्तक मावणें शक्य नव्हतें. तें विनूनें आपल्या हातांत घेतलें. पुस्तकावर सोनेरी अक्षरांत छापलें होतें—

**'निळोबाचा गाथा'**

विनूनें पहिलेंच पान उघडलें. पहिला अभंग वाचला—

**" नको नको मना गुंतूं, मायाजाळीं—"**

---

## बाब्या ! : : ३

बराच वेळ प्रदर्शनाच्या पुढील पटांगणांत मी येरझारा घालीत होतों.

नाना तऱ्हेचे नाना लोक प्रदर्शन पाहण्याकरितां व शक्य तेथें प्रदर्शन करून दाखविण्याकरितां येत-जात होते. आणि जातां जातां एखाद्या मारक्या गाईप्रमाणें हुंदाडून जात होते. माझ्या येरझारा कोणत्या कारणाकरितां चालल्या असाव्यात या गूढ प्रश्नाची आपआपल्या परीनें उपपत्ति लावीत होते. माणसाला स्वतःच्या कृतीपेक्षां परक्याचीच कृति जास्त विपरीत वाटत असते.

लहान शाळकरी छोकरेलोकांच्या दृष्टीनें मला वेड लागलें होतें, हें स्पष्टच होतें. माझी इस्टेट माझ्या कोणत्या तरी नातेवाइकानें लुबाडली असावी आणि त्याचा सूड घेण्याकरितां मी वेळ मिळेल तेव्हां अशाच फेऱ्या मारीत असतों, ही नवलकथा मला एका मुलाच्या तोंडून प्रत्यक्ष ऐकायला मिळाली ! मी येरझारा घालीतच होतों—

वृद्ध पेन्शनर मंडळी माझ्याकडे चष्म्याच्या फुटक्या भिंगांतून तिरक्या नजरेनें पाहून जात आणि दात नसलेल्या थोबाडांतून 'चप्-चप्' आवाज काढीत.

"फार वाईट ! तरुण वय— माणसाच्या हातून काय काय चुका घडवून आणील जंगलीमहाराज जाणे ! तरुणांनीं ताल सोडला तो सोडलाच; पण तंत्रहि विसरून जाणं–! हं ऽऽऽ !" इत्यादि पुटपुटून शोकावेगानें माना हलवीत, कोपऱ्यावर फडफडणाऱ्या रंगीबेरंगी निशाणाला भलतेंच कांहीं तरी समजून आशाळभूताप्रमाणें लंगडत लंगडत हे आधुनिक भीष्माचार्य पसार होत होते. एक वृद्ध गृहस्थ माझ्या पुढ्यांत उभे ठाकले. मीं त्यांच्याकडे आपादमस्तक

न्याहाळून पाहिलें. शरीरकाठी 'अश्शी लव्वे तश्शी लव्वे' पद्धचीचीच होती. पायांत वडील मुलानें टाकून दिलेले भोकें पडलेले पांढरे बूट होते. अर्थात् वाद्यांचें बंधन बुटाला नामंजूर होतें. बुटावर मळकट पायमोजांचें जानवें लोळत होतें. लांबरुंद धोतर, पण नेसतांना त्याचा अगदीं राजापुरी पंचा झाला होता. त्यामुळें नडगीवरच्या निळया शिरा स्पष्टपणें दिसत होत्या. मानला तर कोट; आणि मानलें तर पोतें अशा थाटाचें कांहीं तरी अंगावर होतें. डोक्यावरचा मामलेदार असतांना खुलणारा रुमाल, अत्तां, भाजीच्या पिशवी-प्रमाणें खाकोटीला कोंबला असल्याकारणानें डोक्यावर वाखाच्या दोऱ्याप्रमाणें खुलणारी शेंडी शोभून दिसत होती. मनांत एक विचार येऊन गेला, कीं या माणसाच्या जगण्याचा चिवटपणा पाहून ब्रिटिश सरकारसुद्धां वचकून राहील; तेथें तरुणांचा काय पाड!

"काय हो! तुम्ही आमच्या मुलाचे मास्तर आहांत ना?"

मीं दचकून वर पाहिलें. भावाच्या चेहऱ्यावरून केलेली बहिणीच्या रूपाची परीक्षा जशी हमखास चुकते, त्याप्रमाणें वडिलांच्या आणि मुलांच्याहि बाबतींत हा घोटाळा नक्की होत असतो; म्हणून मीं प्रश्नार्थक चेहरा करण्यापलीकडे दुसरें कांहींच केलें नाहीं.

"म्हणजे, मी परांजपे— माझा मुलगा आपल्या शाळेंत आहे. तिसरींत असेल कदाचित्. आज पांच वर्षं तुमच्या शाळेंत आहे. म्हटलं, हें तुमचं शिक्षण का सोंग?" म्हातारा हसून म्हणाला.

शेतकरी आणि शाळामास्तर यांच्यावर जातां जातां शेणसडा उडवणार नाहीं तो मनुष्य कसचा? विशेषतः शिक्षणशास्त्र हा एक इतका लवचीक मामला आहे, कीं कोणीहि त्यावर आपलें मत ठेवून द्यावें. नक्की कोठें ना कोठें तरी आधार सापडणारच. मीं आपलें मौनव्रत पुढें चालू ठेविलें.

"आतां पाहा. म्हणजे इतकीं वर्षं राहून मुलाला इंग्रजींत सबंध सात मार्क मिळावेत म्हणजे आश्चर्य आहे! त्यांतून मी त्याला शिकवीत असतांना—!" गृहस्थ अभिमानानें म्हणाले.

अगदीं जिभेवर आलें होतें, कीं तुम्ही त्याला शिकवण्याच्या भानगडींत पडला नाहींत, तरच त्याचें कल्याण होईल असें स्वच्छ सांगून टाकावें; परंतु पालक हा आम्हा शिक्षकांचा परमेश्वर! ही ब्याद टाळावी म्हणून जरा दूरवर पाहिल्यासारखें केलें व त्यांना ऐकूं जाईल इतक्या लहान आवाजांत पुटपुटलों, " काय करावं या मिस् पागलला कुणास ठाऊक! आतां येतें म्हणून गेली अन्—" मात्रा लागू पडली. बगळ्यासारखी मान उंचावून स्वारी त्या दिशेनें पाहूं लागली. मी हळूच दूर सटकलों. दुसऱ्या बाजूला माझ्या येरझाऱ्या सुरू झाल्या.

माझ्या समवयस्क मित्रांनींहि 'अहो शिक्षणशास्त्रज्ञ' म्हणून माझी टवाळी करण्याची सुसंधि वायां दवडली नाहीं.

कोणत्या ना कोणत्या तरी विषयावर विवाद करण्याची खोडच लागून राहिलेल्या कॉलेजांतील चार तरुणी त्या दिशेनें येत होत्या. वेशरचना, केश-रचना चौघींचीहि सारखीच होती. अशा बोलत होत्या, कीं दुसऱ्यानें मधें बोलायची सोय नव्हती. जर बोलण्यावर एखादा कर ठेवला गेला असता, तर बापाचें किंवा नवऱ्याचें दिवाळें निघालें असतें!

" काय ग मिनू, तुझा श्रीपाद नाहीं ग दिसला बरेच दिवसांत?" एकजण म्हणाली.

" माझा श्रीपाद—?" मिनू भुवया वर चढवून मिस्किलपणानें हसत म्हणाली.

" नाहीं तर काय माझा वाटतं? अहाऽऽऽहा! किती जरी फणकारा आणलास तरी कोंबडं झाकायचं नाहीं बरं का! विठ्ठलवाडीच्या रस्त्यानं डझनावारी झालेल्या सहलींचा अर्थ न समजण्याइतकी कांहीं मी दुधखुळी नाहीं बरं का—!" पहिली उत्तरली.

" आणि रेस्टॉरंटमधील काचेच्या दाराआड झालेली तुमची हातदाबी आमच्याहि दृष्टींतनं सुटलेली नाहीं बरं का!" मिनू उलट म्हणाली.

" मग? त्यांत काय आहे?"

" कशांत काय आहे मग?" इत्यादि इत्यादि—

माझ्याकडे लक्ष देण्याचें त्यांना कांहींच कारण नव्हतें. आल्या तशा त्या सरळ निघून गेल्या. मी जाग्यावरच उभा होतों. शेवटीं मनाचा हिय्या करून, थकलेल्या मनानें व शरीरानें मीं प्रदर्शनाच्या आवारांत प्रवेश केला.

" कांहीं तरी लहान मुलाकरतां– म्हणजे असें, कीं– लहान मुलांना बक्षीस देण्याकरितां, वाढदिवसानिमित्त—" मी पहिल्याच दुकानदाराला उद्देशून पुटपुटलों.

कुंकवामण्याची पेटी, आजोबांच्या वेळेपासून चालत आलेल्या लांकडी रंगीत बाहुल्या, गंगावनांचे झुपके, इत्यादि माल दृष्टीस पडतांच मीं दचकून वर पाहिलें. तुळशीबागेंत रोजच्या भरणाऱ्या प्रदर्शनांत पोळपाट, लाटणें, किसणी, तवा इत्यादि हरहुन्नरी जिनसांवर जगाचा योगक्षेम करणारा पिचक्या डोळ्यांचा रणछोडदास समोर पाहतांच मी मुकाट्यानें पुढें सरलों.

" हें पहा—" मी बोलण्यास सुरुवात करणार इतक्यांत समोरून चालत जाणाऱ्या तरुणींकडे दुकानदार मोठ्या आशेनें पाहूं लागला. आतां मात्र आपली डाळ शिजणें कठीण हें ओळखून मीं पुढच्या दुकानांत तोंड घातलें.

हा दुकानदार पोक्तापुरवता दिसत होता. रंगीबेरंगी फडक्यानें याची वृत्ति द्विधा होणार नाहीं; कदाचित् चार-दोन पोराबाळांचा धनी असावा अशा समजुतीनें मी त्याच्याजवळ गेलों—

" लहान मुलाला देण्याकरितां—" मीं सुरुवात केली.

" काय ? दानधर्म करण्याकरतां भाडीं भरून गांवांतून इथं आलों आहोंत वाटतं ? कांहीं जिवाला शरम तरी ? कोण महागाईचे दिवस ! भाडीं तरी कोण भरमसाट ! अन् म्हणे पोराला द्या ! चांगले अब्रूदार दिसतां कीं ! पोराला खायला नसेल तर चोरी कां नाहीं करीत ? फुकट खायला पाहिजे—"

दुकानदार आंब्याच्या वर्फीचा तुकडा तोंडांत टाकीत म्हणाला !

मनांत योजून ठेविलेलें कार्य दैव हाणून पाडणार या विचारानें खिन्न होऊन इकडे तिकडे पाहूं लागलों इतक्यांत—

**" Enquiry—चौकशी खातें "**

हीं अक्षरें जणूं काय वाट चुकलेल्या वासराला हंबरण्याची साद देऊन

धीर देणाऱ्या गोमाते-(जय कोणी तरी !) प्रमाणें भासलीं. मी चटकन् तिकडे वळलों.

चौकशीखात्याच्या हपीसचें स्वरूप दुष्काळांत उघडलेल्या तांदळाच्या हंगामी दुकानापेक्षां जास्त आकर्षक नव्हतें. एकंदर तीन बाकें. दोन मोडकीं व एकावर चहाच्या कपाचे वर्तुळाकृति डाग आणि त्यावर घोंगावणाऱ्या माशा ! सुमारें अर्धशतकापूर्वी किर्लोस्करवाडींतून फेकून दिलेली आणि त्यानंतर जगाचा प्रवास करून आयुष्याला आंबलेली, विटलेली अशी एकुलती एक लोखंडी खुर्ची, म्युनिसिपालिटीच्या शाळेंतूनसुद्धां निकामी म्हणून फेकून दिलेलें टेबलवजा स्टूल, ह्या वस्तु फर्निचर म्हणून मानल्या असतां मनाचें समाधान होत असेल तर मग बोलणेंच खुंटलें ! आरास या दृष्टीनें पऱ्याच्या आडोशावर एका कोपऱ्यांत महात्मा गांधी दांडीच्या प्रवासाला निघालेले दिसत होते; आणि त्यांच्या समोरच्याच कोपऱ्यांत एक टॉमेटो-सारख्या लाल व फुगीर गालाची बाई कुठलेंसें केसविनाशक मलम (अर्थात् सुगंधी) लावण्याचा, येणाऱ्या-जाणाऱ्यांना उपदेश करतांना दिसत होती. अर्थात् कोरड्या उपदेशापेक्षां उदाहरणाचा ओलावा जास्त परिणामकारक होतो म्हणून, रात्रंदिवस एका हाताची बगल वर धरून अदूरदृष्टि चष्मा-धाऱ्यांचीसुद्धां खात्री पटवून देण्याची तिची धडपड कौतुकास्पद होती ! एका कोपऱ्यांत पाण्याचें मडकें घामाघूम झालेलें दिसून येत होतें आणि दारा-जवळच्या कोपऱ्यांत बऱ्याच वहाणा व छत्र्या बेवारशी पडून राहिलेल्या दिसत होत्या. प्रदर्शनासारख्या ठिकाणीं हृदयेंसुद्धां जिथें बेमालूम विसरलीं जातात तिथें वहाणा आणि छत्र्या यांना कोण विचारतो !

एक मनुष्य एका आर्धीच्याच फाटक्या टोपीचे शिल्लक राहिलेले धागे दातानें कुरतडत, आल्यागेल्याकडे गूढगुंजनात्मक दृष्टीनें पाहत, बाकावर धड-पणें बसण्याची कसरत करीत असलेला मला दिसला. काखेंतील छत्री घट्ट पकडून मी पुढें झालों—

"बरं का—" मी सुरुवात करणार इतक्यांत—

"आली पीडा !" या मुद्रेनें त्यानें माझ्याकडे पाहिलें व 'थूः' करून अडकलेलें सूत दूर केलें.

"माझा एक पुतण्या आहे—" माहितीवजा प्रस्ताव म्हणून मीं म्हटलें.

"नोकरी मिळणार नाहीं—" बेकार चेहऱ्याचें बाळ खवळून उद्गारलें.

"छेः ! छेः ! नोकरी नको आहे त्याला–" मी आश्वासन देत म्हणालों.

"मग या ठिकाणीं काय टिपणं ठेवलीं आहेत वाटतं ?" तो आंबट चेहरा करून म्हणाला.

"तसं नाहीं हो ! मुलगा आहे अकरा-बारा वर्षांचा. त्याला टिपणाचं खत काय करायचं ? त्याला मी एक बक्षीस देणार आहे. तेव्हां मुलांना बक्षीस देण्याजोग्या वस्तु कोणत्या विभागांत मिळतात ते मला सांगाल का ! आणि कृपाकरून चावलेल्या टोप्यांचे धागे माझ्या अंगावर न उडतील अशा बेतानें बाजूला थुंकण्याची मेहेरबानी कराल का ?" मी शक्यतोंवर शांतपणें म्हणालों.

विंचवानें फटकारल्याप्रमाणें गृहस्थ ताडकन् उठून उभा राहिला !

"वाः ! वाः ! वाः ! आधींच कां नाहीं तसं सांगितलंत ? आमच्या प्रदर्शनांत अखिल भारतांतील, नानाविध प्रकारचीं, अत्यंत कुशल कारागिरांनीं अविश्रांत, खपून अत्युत्तम, शुद्ध स्वदेशी आणि Nothing but स्वदेशीं अशीं सुबक खेळणीं—" पाठ केलेल्या नटाप्रमाणें तो तावातावानें बडबडूं लागला. त्याला आवरणें महाकर्म कठीण होतें.

"माझं ऐकून घ्या ! हें तुम्ही जें बडबडलांत तें मला पाठ आहे. मी सांगतों, ऐका. माझा पुतण्या हा कांहीं सामान्य मुलगा नाहीं. गोकाकचा लाकडी दोडका त्याच्या हातांत एक क्षणभरसुद्धां टिकणार नाहीं. एका क्षणांत त्याची काकडी होईल. मुलाचे आईबाप विद्वान् आहेत. आई आहे बी. ए. नापास व बाप आहे मानसशास्त्राचा प्राध्यापक. तेव्हां—" मी मध्येंच म्हणालों.

"अस्सं ! म्हणजे गांवरान काम नाहीं–! नक्षत्राचं तेज आहे. अच्छा ! त्याला मSSग विलायती पद्धतीवर बनविलेली मेकॉनोसारखी चीज—शुद्ध स्वदेशी हं ! श्री. भंपकराव पुणतांबेकर यांच्या स्वतःच्या कारखान्यांत, खुद्द स्वदेशी भांडवलावर; आणि—"

"बापाची सुरळीत चालणारी मोटार मोडण्याची धमक ज्याच्या अंगांत आहे, त्याला मेकॉनो देऊन काय फायदा ?" मी संशयित स्वरानें म्हणालों.

मुलाचें वर्णन ऐकून, मला वाटतं, गृहस्थ थोडासा चरकलाच !

" मग क्रिकेट बॅट, फुटबॉल– देशी हं–" तो आठवण करीत म्हणाला.

" कसं तुम्हांला सांगूं, राम जाणे ! ब्रॅडमनचा गुरु होण्याची लायकी सिद्ध करण्याकरितां—अहाहा ! त्यानें आतांपर्यंत कमींत कमी दोनशें खिडक्यांचीं तावदानें फोडलीं असतील. मला वाटतं तो विचार रद्द केलेलाच बरा. दुसरं कांहीं तरी—" मी म्हणालों.

" एखादं शास्त्रीय खेळणं—देशीच बरं का !" तो डोकें खाजवीत म्हणाला.

" देशीचं तुणतुणं थोडा वेळ बंद करा पाहूं ! या प्रदर्शनांत मिळणारा माल देशीच असतो हें मला माहीत आहे. पुन्हा तेंच तेंच काय सांगतां मला ? शास्त्रीय खेळणं माझ्या पुतण्याला देणं शक्य नाहीं. घरांतले सगळे विजेचे दिवे फोडण्याचं श्रेय माझ्या पुतण्याला आहे हें लक्षांत घ्या —" मी जरा अभिमानानें म्हणालों.

" दारूकाम—- म्हणजे उडवण्याची दारू—-" तो स्वतःशींच हसत म्हणाला.

" शेजारच्या बंगल्यांतील माणसांना फिटा येऊं लागल्या आहेत मागच्या दिवाळीपासून ! ह्याला कारण हा मुलगा ! फटाकड्यांच्या माळा त्यांच्या टोपीवर—" मी म्हणालों.

आतां मात्र स्वारी चूपचाप झाल्याप्रमाणें दिसली.

" मग जादूचीं पुस्तकं, गुरुकिल्ली, पत्त्यांची हातचलाखी वगैरे प्रकार—" तो मोठ्या आशेनें म्हणाला.

" अहो, हें कोलीत त्याच्या हातांत देणं जरा धोक्याचंच नाहीं का? जादूचा अवलंब केल्याशिवायच घरांतले जिन्नस हातोहात लंबे करण्याची कला त्याच्याजवळ मुळांतच आहे. मागच्या वर्षी तर ह्याला रेफर्मेटरींत धाडावा कीं काय हा प्रश्न माझ्या डोक्यांत घोळत होता–" मीं खिन्नपणें हसून म्हटलें.

" एखादं वाङ्मयीन पुस्तक —कादंबरी, नाटक, लघुकळा, दीर्घकळा–"

" नको ! त्या अवकळा त्याच्या हातांत नकोत ! वाचलेल्या नाटकाचे प्रयोग रोज घरांत सुरू होतील; अन् मग घरांतील माणसांना गोठ्यांत राहणं परवडलं असं होऊन जाईल !—घरांत तमाशे नकोत !"

आतां मात्र तो धैर्याचा मेरुमणि ढासळल्याप्रमाणें दिसूं लागला ! त्याच्या चिपडलेल्या डोळ्यांतून एकदोन अश्रुबिंदु (फुलावरचे हिम-तुषार हा कविसंकेत !) तरळत असल्याचा मला संशय आला.

" असं जर आहे तर मग काय हो, याला कसलं बक्षीस देतां ? प्रदर्शनां-तली एखादी वस्तु त्याला देण्यापेक्षां त्यालाच का नाहीं एखाद्या विभागांत आणून बसवीत ?" होः होः होः करीत तो म्हणाला. मला थोडा राग आला, पण विचार करण्यासारखा मुद्दा होता यांत शंका नाहीं. आचरट माणसेंसुद्धां एखादे वेळीं वेदवाक्यें बोलतात तें कांहीं खोटें नाहीं. परंतु पुन्हा प्रयत्न करून पाहावा या उद्देशानें मीं म्हटलें—

" छेः ! कांहीं तरी सापडेलच पाहा. असं निराश होऊन कसं चालेल ? अन् त्यांतून आईबापांना काय वाटेल याचा नको का विचार करायला ? मुलाला वाढदिवसानिमित्त काकाकडून बक्षीस नाहीं म्हणजे कसं जग चालेल ? जेवण तरी जाईल का आईबापांना ? कल्पना करा– तुम्हांला जर असा मुलगा असता—"

सर्पदंश झाल्याप्रमाणें तो गृहस्थ किंचाळून म्हणाला—

" मुलगा ? लग्नालापत्ता नाहीं– अन् म्हणे मुलगा ! पुन्हा मुलाचं, नांव काढूं नका. आणि जर तुम्ही म्हणतां तसा मुलगा आम्हांला झालाच तर समुद्रांत उडी टाकूं आम्ही— "

त्याच्या 'आम्हीं'त सामावणारी दुसरी कोण भाग्यवान् व्यक्ति असेल आणि तिचेहि विचार हेच असतील काय हें जाणण्याची मला तितकीशी जरूरी नसल्यामुळें मीं पुन्हा त्याला मूळ विषयाकडे खेचला. " असं कसं म्हणून चालेल ? दिवसेंदिवस जग सुधारत आहे. अशाच तऱ्हेचीं मुलं, सजीव मुलं आपल्या राष्ट्रांत निर्माण झालीं पाहिजेत. प्रफुल्लित विकास पावलेल्या मनाचीं, शरीरयष्टि आगगाडीच्या रुळाप्रमाणें कणखर असणारीं बालकं आपल्या देशाला पाहिजे आहेत. नवीन पद्धतीनं, मुलांच्या मनोव्यापाराचं संपूर्ण परीक्षण करून दिलेलं शिक्षण आपल्याला बेहद्द, बेछूट अन् बेडर अशीं बालकं देत आहे." मी नव्यांची तरफदारी करीत म्हणालों.

" तें बें बें करायला लावणारं मूल म्हणजे एक कोडंच दिसतंय् बुवा! पण हें पाहा–मला एक नामी कल्पना सुचली आहे. मुलाला बक्षीस न देतां त्याच्या वडिलांनाच दिलं तर—" तो आनंदानें म्हणाला.

" कल्पना छान आहे ! प्रश्न एवढाच येईल, कीं तुम्हांला नाथ म्हणून म्हणायच्याऐवजीं तुमच्या भावी वधूनं तुमच्या वडिलांनाच तें संबोधन लावलं तर तुम्हांला काय वाटेल ? बरं, थट्टा जाऊं द्या. पण त्याच्या वडिलांना तरी काय देणार ? " मी हसून म्हणालें.

" अत्यंत सोपी गोष्ट ! परवांच एक कलकत्त्याचा कारागीर आला आहे; म्हणजे प्रदर्शनांत कांहीं तरी नवीन असतं असं दाखवण्याकरतां आम्हीच त्याला कलकत्त्याहून आला असं समजतों; आणि तसं लोकांना कळवतों. अतिशय सुंदर अशा वेताच्या काठ्यांचा जंगी साठा त्यानं प्रदर्शनांत आणला आहे. दुकानहि फार लांब नाहीं. त्या ओळींत तिसरं–" दरवाजांतून त्या दिशेकडे हात फेकून तो म्हणाला, माझें समाधान झालें. वडिलांना नजर केलेल्या छडीचा वडिलांनीं वाटेल तो अर्थ लावावा अगर–! एक महत्त्वाचा प्रश्न इतक्या सुलभ रीतीनें सुटेल अशी कल्पनासुद्धां प्रथम मला नव्हती. कवि-कल्पनेंत वावरणारी पगाराची छडी प्रत्यक्ष व्यवहारांत कधींच उपयोगी पडत नसते – मधूनमधून—!

मी हसतमुखानें त्या निर्देशिलेल्या दुकानाकडे वळलें.

---

## बी. ए. ची परीक्षा ! : : ४

" आतां तुम्हाला सर्व कांहीं समजूं लागलं आहे. तेव्हां जास्त लिहिण्यांत कांहींच मतलब नाहीं—" इत्यादि वचनांनीं परिपूर्ण असलेला पित्याचा नागमोडी संदेश एक बाळबोध वळणाचा तरुण पुण्यांत आपल्या खोलींत अस्वस्थ चित्तानें वाचीत होता.

या दूरस्थ पेन्शनर पित्यांची काय कल्पना असते हरि जाणे ! मुलानें पहिल्या सपाट्याला पास व्हावें हें इतकें का सोपें आहे ? तरुणांच्या काय अडचणी असतात याची त्यांना काय कल्पना येणार ? आठवड्यांतून दोन पत्रें मुलाला धाडून तोच तोच मजकूर खरडण्यांत यांना काय आनंद वाटत असेल देव जाणे !

इतक्यांत मनोहरच्या टेबलावर वरून पुनः माती पडण्यास सुरुवात झाली.

आज दोन महिने तो उगीच गंमत पाहत होता. प्रथम त्यानें उंदरांच्या कुळाचा उद्धार करण्यांत धन्यता मानली. परंतु पुढें त्याला निराळाच अनुभव येऊं लागला. वर राहणारे माधवराव पोस्टांत R. M. S. इन्स्पेक्टर होते, आणि त्यांनीं घराबाहेर पाऊल टाकलें, कीं वरून माती पडायला सुरुवात होते हा त्याला शोध लागला होता. शालिनी आणि तिची आठ वर्षांची बहीण मालिनी यांचा, या माती पडण्याशीं फार लगतचा संबंध असावा हें त्यानें ताडलें. परंतु माधवरावांच्या घरांत तीन माणसांपेक्षां चवथें कोणीच नव्हतें आणि माधवरावांच्या कानांवर त्यांच्या मुलींच्या कागाळया घालणें त्याला अनुदारपणाचें वाटलें.

परंतु या दोन मुलींना उदारपणाचें वावडें असल्याचें स्पष्ट दिसत होतें. माती झाडून टाकण्याकरितां त्यानें टेबलावरून हात फिरवला, त्यासरशीं बोटांत टांचणी शिरली.

वरून माती पडतच होती!

मनोहर निश्चयानें खुर्चीवरून उठला आणि धाड्धाड् पाय वाजवीत वरच्या मजल्यावर गेला. दार अर्धवट उघडेंच होतें.

परंतु आंतील देखावा पाहतांच तो जिन्यांतच उभा राहिला. वडिलांचा रेनकोट पांघरून शालिनी मालिनीला बुवा आल्याची भीति दाखवीत होती, आणि मालिनी त्या बुवाच्या, वेणीच्या साहाय्यानें बनवलेल्या मिशा पकडण्याकरितां खुर्चीवर उभी राहून उड्या मारीत होती. बुवाला फेकून मारलेल्यांपैकीं उशा इतस्ततः लोळत पडलेल्या होत्या. शालिनीचें नवें कोरें पातळ जोडे ठेवण्याच्या फळीवर पडलें होतें. माधवरावांचें धोतर आढ्याला टांगलेल्या हुकाशीं धिंगामस्ती करीत होतें. मालिनीच्या परकर, पोलकीं वगैरे वस्त्रांचा जणूं काय सडाच पडला होता!

शालिनीनें मनोहरला जिन्यांत पाहतांक्षणींच रेनकोट टाकून दिला आणि घाईघाईनें मिशांना रजा दिली. मनोहर वर येण्याचा आपला हेतु अजीबात विसरून गेला. थोडा वेळ कोणीच कांहीं बोलेना.

" माधवराव कुठं कामावर गेले आहेत का?" मनोहरनें मालिनीकडे पाहत सुरुवात केली.

" हूं." म्हणून शालिनीनें उत्तर दिलें.

" दोन दिवस येणार नसतील?" मनोहरनें प्रश्न केला. पुन्हा शालिनीचा हुंकार आला.

मनोहरच्या सर्व प्रश्नांस अशा रीतीनें बराच वेळ हुंकार मिळत गेला. शेवटीं जातां जातां, " खालीं माती पडत होती, म्हणून सांगायला आलों होतों—" असें अर्धवट आपल्याशींच पुटपुटत मनोहर खालीं जाऊं लागला. तो दोन पायऱ्या उतरतो तोंच शालिनी धावतच दरवाजापाशीं आली. मनोहर पुन्हा थांबला.

" बाबांना सांगू नका हं." म्हणून ती कातर स्वरांत हलकेच पुटपुटली. मनोहर 'हूं' करून जिना उतरूं लागला. पुन्हा पांच मिनिटांनंतर त्याच्या टेबलावर दुप्पट वेगानें माती पडण्यास सुरुवात झाली !

छेः ! कांहीं झालें तरी या माती पडण्याचा बंदोबस्त झालाच पाहिजे, पण माधवरावांना मात्र कळतां कामा नये. पुण्यांतल्या जुन्या घरांविषयीं त्याचें मत चांगलेंच कलुषित झालें. पुराणवस्तुसंग्रह खात्याविषयीं त्याला आतां तितकासा आदर वाटेनासा झाला; आणि १९५० सालाऐवजीं याच सालीं जर हीं जुनीं घरें रस्तारुंदीच्या कलमाखालीं पाडून टाकण्यांत आलीं तर काय बहार होईल, हाहि विचार त्याच्या डोक्यांत येऊन गेला.

वाड्याच्या मालकिणीशीं त्यानें सहजच बोलणें सुरू केलें.

" सत्यंकाकू, आपला वाडा बराच जुना असेल नाहीं ? " तो म्हणाला.

" बराच म्हणजे काय विचारतोस ? अरे, तुझ्या आजोबांची याच वाड्यांत मुंज झाली. तुझ्या वडिलांचं इथंच लगीन झालं. छत्तीस वर्सं तुमचं बिऱ्हाड आमच्या घरांत होतं. तुझे वडील नोकरीकरितां बाहेर गेले... " इत्यादि इत्यादि व्याख्यान मनोहरला ऐकणें प्राप्त झालें.

संधि साधून हळूच त्यानें आपली तक्रार पुढें मांडली—" फार उंदीर झाले आहेत घरात; सारखी माती पडते." म्हणून पुस्ती जोडण्यास मात्र तो विसरला नाहीं.

" अरे, उंदीर कसले आले आहेत डोंबलाचे ! तुझ्या वर त्या माधवरावांचं बिऱ्हाड आहे ना ! आपला मनुष्य साधाभोळा, म्हणून बोलायचं नाहीं. पण ती थोरली पोरगी—अगदीं नांव काढूं नकोस. आई होती तोंपर्यंत कशी सुतासारखी सरळ होती. पण आतांशा शाळा सोडल्यापासून हा धिंगाणा तिचा ! आतां तुला जर त्रास होत असेल तर माधवरावांना स्पष्टच सांगून बिऱ्हाडच काढून टाकीन—" सत्यंकाकू म्हणाल्या.

मनोहरला तेंच नको होतें !

" छेः-छेः ! काकू, तसा कांहीं विशेष त्रास होत नाहीं मला ! अन् काकू, तुमचं तरी नुकसान नाहीं का होणार ? छेः छेः ! तिसऱ्या मजल्यावर

बिऱ्हाड लवकर यायचं नाहीं. मी पुढच्या माडींत बसत जाईन वाचण्या-पुरता." मनोहर घाईघाईनें म्हणाला.

बोलल्याप्रमाणें मनोहर पुढच्या माडींत कधींच गेला नाहीं. आणि राहत्या माडींत वाचण्याचें त्यानें मनांतसुद्धां आणलें नाहीं. वरून पडणाऱ्या मातीकडे पाहत वरचा मजला खालीं कसा आणतां येईल ( निदान माती पाडणारें मनुष्य खालीं कसें आणतां येईल ) या प्रश्नाचा विचार करण्यांत तो तासन् तास घालवूं लागला. माधवराव घरीं असले म्हणजे तो त्यांच्याशीं गप्पा मारूं लागला. पोस्ट खात्याविषयीं अणुरेणु माहिती नसतांना आणि पहिल्या तारखेच्या मनि ऑर्डरव्यतिरिक्त इतर सर्व पत्रांबद्दल त्या खात्याला मनापासून शिव्या देणारा मनोहर 'विलायतेहून इतक्या बॅगा येतात अन् अमकी गाडी अमकी टपाल नेते' इत्यादि माधवरावांच्या आवडत्या गप्पा लक्ष देऊन तो ऐकूं लागला.

मालिनीचा त्याला फार लळा लागला. लेकराची जिज्ञासा तृप्त करणें तो आपलें परम पवित्र कर्तव्य मानूं लागला. तिला रोज आपल्या बी. ए.च्या पुस्तकांतील चित्रें दाखवून 'पुस्तक उघडलें नाहीं' ह्या वडिलांच्या नेहमीं-च्या आरोपाला त्यानें नेस्तनाबूद केलें. आणि मधून मधून शालिनीला खुद्द माधवरावांच्या देखत 'काय, कसं काय?' असें लाजत लाजत म्हणूं लागला.

चार महिन्यांच्या अवधींत मानसशास्त्राचें पुस्तक हातांतहि न धरतां त्यानें त्या विषयांत कौतुकास्पद प्रावीण्य मिळविल्याचें श्रेय संपादन केलें.

वरून माती पडण्याचें चालूंच असे.

एके दिवशीं वडिलांचें पत्र आलें. मनोहरनें तें पत्र न वाचतांच टेबलावर टाकून दिलें.

—आणि कृतनिश्चय होत्साता त्यानें अभ्यासाचें पुस्तक उघडलें.

—वरून माती पडण्यास सुरुवात झाली. त्यानें रागानें दाराकडे पाहिलें. दारांत मालिनी उभी होती.

"शालूताईनं तुमचं पुस्तक परत दिलं आहे," असें म्हणत एक जुना मासिकाचा अंक त्याच्या हातांत दिला. अभ्यासाचें पुस्तक त्याच्या हातांतून

गळून पडलें. हातांतला अंक त्यानें सहजच चाळण्यास सुरुवात केली. आंत एक चिठी होती.

" तुम्ही परीक्षेचा अभ्यास करीत असतां हें मला माहीत असूनसुद्धां मी तुम्हांस बरासचा त्रास देतें, हें थोडेंसें बरें नाहीं, परंतु त्याला माझा नाइलाज आहे. आई वारल्यापासून माझी शाळा सुटली. घरांत माझ्याबरोबरीचें कोणीच नसल्या कारणानें आणि बाबा महिन्यांतून तीन आठवडे फिरतीवर असल्या कारणानें मीं वेळ जाण्याचा हा एक मार्ग शोधून काढला आहे. आमच्याकडे कोणी येत नाहीं अन् आम्ही कुणाकडे जात नाहीं. कारण कुठें जावें तर जो तो माझ्यावर टीका करण्यांत धन्यता मानूं लागतो. वीस वर्षांपर्यंत लग्नाशिवाय राहिलें हा कांहीं माझा दोष नाहीं. बाबांना वेळ मिळत नाहीं म्हणून त्यांचाहि नाहीं. बाबा घरांत असले आणि तुम्ही वर आलांत म्हणजे तो दिवस मी सणासारखा समजतें.

इतर दिवशीं मला काय करावें हेंच सुचत नसल्यामुळें मी मालिनीबरोबर हुतुतूचा खेळ खेळतें आणि जिवाची करमणूक करून घेतें. माझ्याविषयीं गैरसमज होऊं नये म्हणून हें लिहिलें आहे. बोलणें शक्य दिसेना, म्हणून हा मार्ग काढला. चिठी फाडून टाकावी आणि हो–! आतां मात्र शक्य तितका त्रास कमी देण्याचें मी आश्वासन देऊन ठेवतें. कारण उद्यां बाबांनीं मुंबईहून फोनो आणण्याचें कबूल केलें आहे–"

खालीं सही नव्हती. मनोहरनें ती चिठी न फाडतां घडी करून कोटाच्या खिशांत ठेवून दिली.

मात्र फोनोमुळें त्रास होईल या म्हणण्यावर त्याचा विश्वास बसणें शक्य नव्हतें.

दिवाळीच्या सुटींत मनोहरला फार अभ्यास होता, म्हणूत तो गांवीं गेला नाहीं.

.. ..सणानिमित्त घरींच जाण्याचें कारण नव्हतें. कारण माधवरावांनीं त्याला " आपण करूं हो चार दिवस मजा. घरींच काय एवढं मोठंसं ! " म्हणून आमंत्रण देऊन ठेवलें होतें.

परंतु आदल्या दिवशींच त्यांना पुण्या-मुंबईची खेप होती. फराळाचें सामान मनोहरनें आणून देण्याचें कबूल केलें. शालिनीच्या यादीप्रमाणें त्यानें सामान आणून टाकलें.

रात्रीं माधवराव आले.

पहाटे मनोहरला उठविण्याकरितां खुद्द माधवरावांची स्वारी खालीं आली. मनांतून तर हवेंच–परंतु शालिनीकडून तेल लावून घेणें त्याला कसेंसेंच वाटलें.

" चला हो तुम्ही ! संकोच कसला करतां ? " माधवराव म्हणाले. " नको, मी इथंच स्टोवर पाणी तापवतों." मनोहर म्हणाला.

" पण तुम्ही लाजतां कां ? " माधवराव हसून म्हणाले.

" नाहीं, तसा लाजत नाहीं. पण कशाला—उगीच—? "

" मनोहरपंत, तुम्हांला एक सांगू का ? रागावूं नका ! आज चार महिने तुमच्या अंगावर मातीचा पाऊस पडत होता, खरं कीं नाहीं ? चला, आज ती माती धुऊन टाकूं. सत्यंकाकूसुद्धां आज तुम्हांला साचण लावून आंघोळ घालायला आमच्या शालीला मदत करणार आहेत." माधवराव म्हणाले. मनोहर स्तिमितच झाला. शेवटीं सत्यंकाकूंची जीभ वळवळलीच म्हणायची !

" आणि दुसरं असं झालं आहे, कीं तुमच्या वडलांचा अन् माझा थोडासा स्नेह असल्याकारणानं त्यांनीं मला एक छोटंसं पत्र अन् तुमची कुंडली पंधरवड्यापूर्वीच पाठवून दिली आहे. आणि म्हणून मीं हा तुम्हांला आग्रह करतों आहे. आणि म्हणून वाण्याचं सामान तुमच्या गळ्यांत टाकलं मीं. लग्नाआधीं हा दिवाळसणच म्हणानात—"

मनोहर एखाद्या सिनेमांतल्या विदूषकाप्रमाणें कोरडें हास्य चेहऱ्यावर आणण्याचा प्रयत्न करीत होता. कसलीशी आठवण होऊन त्यानें चटकन् टेबलावर पडलेलें वडिलांकडून पंधरा दिवसांपूर्वी आलेलें बिनफोडलेलें पाकीट घाईघाईनें फोडलें.

" रा. माधवराव यांची कन्या चि. शालिनी तुमच्याच वाड्यांत राहते असें कळते......आपली परीक्षा पार पडल्यावर जर आपल्यास संमत असेल तर–" मनोहरनें पत्र तेवढेंच वाचलें. मनि ऑर्डरइतकेंच किंवा कांकणभर सरसच

'गोड' पत्र आपल्या वडिलांना कधींमधीं लिहितां येतें हें पाहून त्याला आपल्या जन्मदात्याबद्दल विशेषच आदर वाटूं लागला.

"तेव्हां मग–, मनोहरपंत, तेलाची वाटी खालीं आणायला सांगूं, का तुम्हीच वर येतां? आणि तेल लावीत असतां हें पुराण शालीला सांगत बसूं नका असं तुम्हांला सांगण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण तुम्हीं आमचं ऐकलं तर तरुण पिढी असं तुम्हाला कोण म्हणेल?"

— ४ —

त्या दिवसापासून वरून माती पडणें बंद झालें. परंतु इतर आणखी कांहीं गोष्टी घडून आल्या त्या सांगणें कर्तव्य आहे.

वडिलांची, आईची, माधवरावांची, शालिनीची—आणि कांहीं आंबटशौकी वाचकांची कल्पना होती, कीं मनोहर बी. ए. त फर्स्ट क्लास फर्स्ट येणार, परंतु तसें कांहीं झालें नाहीं. मनोहर परीक्षेला बसला होता, हेंच वडिलांचें भाग्य! यथाविधि त्यानें पेपर लिहिले, यथाविधि तो नापास झाला. परंतु वडिलांची अट त्याच्या हातून पार पडली, म्हणूनच त्याच्याकडून बायकोची परीक्षा पार पडली.

मनोहरनें चारदां बी. ए.च्या परीक्षेकरितां कंबर बांधली. शेवटच्या खेपेला स्वतःचीच नव्हे, तर शालिनीचीसुद्धां कंबर एका सोनुल्यानें घट्ट पकडून ठेवली होती. परंतु......

शेवटीं बी. ए.च्या वाऱ्या करणारा हा वीर R. M. S. मध्यें सासऱ्याच्या वशिल्यानें सॉर्टरचीं दुःखें अनुभवीत मुंबई-पुण्याच्या वाऱ्या करूं लागला.

बी. ए. चा सॉर्टर हा असा झाला!

# फुगा : : ५

पुण्याच्या फलाटावर मनोहर जवळ जवळ शीळ घालीतच उतरला. कसा उतरला?— जणुं काय कैदेंतून निसटून आलेला नेपोलियन प्रथमच फ्रान्स-भूमीवर पदार्पण करीत आहे,— जणूं काय एक वर्षभर चमत्कारिक वेषांत डांबून ठेवला गेलेला अर्जुन कौरवांची खोड मोडण्याकरितां प्रथमच विराट नगरीबाहेर पाऊल टाकीत आहे,— जणूं काय,— पण नकोच! अजून अशा हजारों उपमा डोक्यांतून खरवडून काढल्या तरी मनोहरची ती झाक— तो नूर,— छेः! छेः! छेः! मनोहरला त्या फलाटावर उतरण्याला तोंड नाहीं.

मनोहरनें ती झेप अशी अल्लद घेतली— असा तो धोतराचा कव्हं धरला,— अन् चेहरा असा कांहीं निर्विकार केला, कीं— जर मनोहरला थोडेंसें ढोबळ ज्ञान असतें तर मग मात्र त्याला वरील थोर पुरुषांच्या पंक्तीला बसण्याचा मान मिळाला असता. वास्तविक पाहतां इंग्रजी सात यत्तांपर्यंत माती कुटणाऱ्या (Matriculation होणाऱ्या) कोणत्याहि कुंभाराला गतीचे चार ठराविक नियम माहीत असणें रास्त आहे. पण मनुष्यस्वभावच तऱ्हेवाईक! न्यूटननें महत्प्रयासानें आयते शोधून दिलेले नियम विसरायचे आणि आणि स्वतःच्या अकलेनें नवीन नियम शोधून काढण्याच्या खटपटींत पडायचें!— आणि फलाटावर सपशेल पडायचें!

कारण गाडी अजून अजीबात थांबली नव्हती. आणि ताज्या दमाच्या तरुणाला हें तुमचें असलें रडगाणें कधींच पसंत पडणार नाहीं. गाडी थांबूं देणें, नंतर थांबली कीं नाहीं हें पाहण्याकरितां समोरच्या खिडकींतून पाहणें,—

'हेंच का ठेसण?' म्हणून शेजाऱ्यापासून खाली करून घेणें,-- नंतर डाग मोजणें,— नंतर— छे: ! साफ नाहीं ! आमचा आजचा तरुण गाडी होम सिग्नलच्या आंत शिरतांच फळीवर पाय ठेवून उभा राहील,— तोंडानें एकाद-दुसरी तान मारील, छाती पुढें करून निर्भयतेनें फलाटावर (एक, दोन तीन— मनांतल्या मनांत मोजून) झेप घेईल!—याला म्हणतात सफाई—!

पण अतिविश्वास हा अंधपणाचा जनक असतो. फाजील आत्मविश्वास मनोहरच्या शोभेला कारणीभूत झाला. भोंवतालीं चार-पांच टिकिट-कलेक्टर (ऐट मात्र प्रान्तकलेक्टरच्या वर!), चार-पांच हिरवीं तांबडीं निशाणें घेतलेलीं, निळया रंगाचा साफा डोईस गुंडाळलेलीं रेल्वेचीं मार्गदर्शकें (म्हणजे सांधे ओढणारे पोर्टरसाहेब!), चार दोन इतस्ततः झाडू मारण्याची ऐट मिरवणारे रेल्वेचे आधारस्तंभ, सोलापूरच्या गाडींत म्हणून 'ममईच्या' गाडींत शिरणाऱ्या चार माळिणी, (बया! बया! कशापायीं इकति घाई? गाडी काय थांबणार नव्हती व्हय?) आणि सर्वस्वीं भांबावून गेलेली बाळगोपाळ मंडळी, इतक्या मोठ्या पार्श्वभूमीवर आमचा नायक खरोखरीच शोभून दिसत होता!

"Ticket please—!" प्रान्तकलेक्टर फलाटावर निजलेल्या आकृती-कडे न पाहतांच म्हणाले. कल्पना ही, कीं 'आतां आमचा डोळा चुकवून कसा पळशील? फुकटांत प्रवास? काय तुझ्या वाडवडिलांनीं गाडी बांधली? अन् पुन्हा वर हा पडण्याचा कांगावा? ते दिवस गेले महाराज! आज आम्ही तरी निदान या ढोंगानं फसून एक चिटपाखरूंसुद्धां या गाडीच्या बाहेर सोडणार नाहीं!'

"मिस्टर,—पहिल्याप्रथम तिकीट दाखवा,—धावत्या गाडींतून कशाला उडी टाकलीत?—" दुसरा एक त्याचा समव्यवसायी! "उडी टाकल्याचं एक असू द्या, पण पडलांत कशाला?" दुसरे एकजण म्हणाले. साहजिकच मनोहरची कल्पना झाली, कीं गाडींतून उतरतांना पडायचें असेल तर आाणिक एक दुसरें तिकीट काढावें लागतें. पण असला एखादा कायदा अस्तित्वांत असल्याचें त्याला ज्ञान नव्हतें आणि विचारण्याचें धैर्य होईना.

"दादा पडला व्हय?—" म्हणून एका स्त्रीनें त्याच्या या चमत्कारिक

वर्तनाचा खुलासा विचारला! अर्थात् असल्या प्रश्नाला त्यानें ठराविक तेंच उत्तर केलें,—

" छेः! छेः! उगीच थोडासा तोल गेला—" म्हणून म्हणत मनोहरनें त्या पृच्छकांचें सांत्वन केलें!

कोणताहि निर्जीव वा सजीव पदार्थ, आहे त्याच स्थितींत बराच कालपर्यंत राहणें सृष्टिनियमाविरुद्ध असल्याकारणानें मनोहरचें तेथून उठणें क्रमप्राप्तच होतें. पण मनांतल्या मनांत मात्र त्याला जन्मभर तेथेंच पडून राहावेंसें वाटत होतें यांत शंका नाहीं. धडाडीचीं कामें सर्वांनाच करावींशीं वाटतात, पण त्यांत यश मिळत असेल तर कबूल! मनोहरनें धडाडीनें उडी टाकली. पण यश मात्र—उं हूंः! स्वाभाविकपणें नको हा ताप,—नको हें लाजिरवाणें जिणें असें होऊन गेल्यास त्यांत त्याचा काय अपराध होता?—

मनोहरनें रुमालांत गुंडाळून ठेवलेलें तिकीट पुढें करतांच एका सरावलेल्या धंदेवाईक टिकीटकलेक्टरनें त्या टिकिटाच्या पाठीमागली बाजू प्रथम तपासली. तारखेंत कोठेंच गोंधळ दिसेना.

" तुमचं सामान काय आहे?" तिकीट परत करीत ते सद्गृहस्थ उद्गारले.

" एक ट्रंक,—एक वळकटी,— एक दुधाचा तांब्या अन् जुन्या वहाणांचा जोड—" मनोहरनें लाजून उत्तर केलें.

त्या गब्रूनें सामानाचें अंदाजीं वजन काढण्यास सुरुवात केली—आणि—

खरें सांगायचें म्हणजे त्या दिवशीं मनोहर पुरा जिरला. आत्महत्या हें पातक म्हणून शास्त्रानें ओरड केली नसती,— व कायद्यानें प्रतिबंध केला नसता आणि मनाची तयारी असती तर— तर— मुंबईच्या एका गाडीची चांगलीच खोटी होणार होती. मनोहरच्या सामानाचें वजन केलें गेलें. जास्ती वजनाबद्दल जादा भरपेट रक्कम द्यावी लागली—अन् 'चोरा! कसा सापडलास! सतरा शेर सामान आणतोस काय? रेल्वेला फसवतोस?' इत्यादि वचनांनीं परिपूर्ण असे दृष्टिक्षेप त्याला सहन करावे लागले. बरें— पैसे द्यायचे तर चिल्लर जवळ नाहीं. त्याकरतां त्याला जवळ जवळ तासभर उभें राहावें लागलें.

त्या वेळीं मनोहरला कळून चुकलें, कीं हिंदुस्थानांतल्या आगगाड्या लोकांच्या सोईकरतां, सुखाकरतां म्हणून नसून— त्यांना पाडण्याकरतां, त्यांचें

सामान काट्यांवर घालण्याकरतां,--'टिकीट' म्हणून अंगावर खेंकसण्याकरतां आणि दहा रुपयांच्या मोडीकरतां त्यांना तासभर उभें करण्याकरतां—केवळ त्याचकरतां निर्माण केलेल्या आहेत !

नशीब समजायचें, कीं त्याचेंच खुद्द वजन करण्याचें त्यांनीं मनांत आणलें नाहीं. मनांतल्या मनांत त्यानें देवी रूपाभवानीला साक्ष ठेवून प्रतिज्ञा केली, कीं मी जेव्हां पुढें प्रसिद्धीला येईन तेव्हां तेव्हां 'दळणवळणाच्या जुन्या सुखसोई आणि हल्लींच्या गैरसोई' हा लेख लिहीन. आणि रेल्वेवर टीका करीन. आणि मी स्वतः पायीं चालण्याचा संप्रदाय पाडीन—रेल्वे ! रेल्वे ! !

बाहेर येतांच त्याला खाकी रंगानें गराडा घातला. लढवय्या लोकांचे कपडे खाकी रंगाचे कां असतात हें एक कोडेंच आहे आणि पुण्यांतल्या टांगेवाल्यांचे कपडेहि त्याच रंगाचे कां असावेत हें त्याहून विलक्षण कोडें आहे. टांगेवाला आणि लढवय्या हे समसमान समजायचे कीं काय ? आणि असल्या लोकांना मोकळें सोडून कुणाला आजवर शांतता मिळाली आहे ?

एकानें त्याला (चाबूक पुढें करून) मोठ्या कळवळयानें सांगितलें—'साहेब, गरीबाकडे लक्ष असूं द्या.' दुसऱ्यानें त्याला 'काका' म्हणून म्हटलें, तिसऱ्यानें त्याला तत्त्वज्ञान ही चीज काय असते हें दाखवलें—'पहा बुवा ! गरीबाला कोण वाली असणार ? ज्याचा चाबूक मोठा त्याच्याकडे गिऱ्हाइकाचा वाटा—' इ० इ०

मनोहरला याचा उलगडाच पडेना. स्टेशनवरून घरापर्यंत पोंहोचविण्याचें काम हे लोक करतात का व्यासपीठावर उभे राहून व्याख्यानें देतात ?

मनोहर खरोखरीच कंटाळून गेला. आसमन्तात् काय चाललें आहे हें त्याला मुळींच कळेना. आपण कोण आहोंत हेंहि तो विसरला. एकाएकीं त्याला गुडघ्यावर कळ आल्यासारखें वाटलें. गुडघ्याच्या वर लालभडक मांसुरडें दिसतांच त्याला कसेंसेंच झालें—आणि उद्यांचा हा नामांकित लेखक प्राणी एखाद्या क्षुल्लक हेलकऱ्याप्रमाणें ट्रंकेवर बसला.

आणि कोठून तरी, कोणी तरी आपल्याला 'मनोहर' म्हणून हाक मारीत असल्याचें त्याला भासूं लागलें—आणि पुढें अंधार !

पुणें शहराचें एक वैशिष्टय प्रत्यक्ष मुंबईलासुद्धां कबूल करावें लागेल. तें हें कीं, पुण्यांत कोणतीहि चळवळ तीन वर्षांच्यापेक्षां जास्त टिकून राहत नाहीं. कारण एकच आणि तें हें, कीं—पण खोल पाण्यांत शिराच कशाला ?

हा विचार सुचण्याचें कारण चहा. चहा हें व्यसन आहे—चहा ही नादानपणाची निशाणी आहे– या तत्त्वावर कांहीं दिवस चहाला या शहरांत कांहीं कांहीं ठिकाणीं बंदी होती. पण तो काल गेला होता. आतां वारे उलट दिशेनें वाहूं लागले होते.

एके काळीं चहाविरुद्ध आकांडतांडव करणाऱ्या अशाच एका चहापानाच्या दुकानांत मनोहर भांबावलेल्या स्थितींत चहाच्या प्रसारार्थ भिंतीवर लावलेलीं प्रथकनें वाचीत होता.

प्रथकन नं. १—त्याला आपल्या आरोग्याची काळजी घेण्यास परोपरीनें विनवीत होतें, " बाबांनो,—तुम्हांला आरोग्य पाहिजे ना ? हुशारी पाहिजे ना ? मग हा हायलंड चहा प्या आणि आरोग्यकारक व्हा."

देव जाणे हें मराठी भाषान्तर करणारा कोण जातीचा होता तें !—

प्रथकन नं. २– त्याला पुन्हा एकवार बजावून सांगत होतें कीं, हा हायलंड चहा पिऊन प्लेगरहित व्हा. सर्वमुक्त व्हा. आणि आरोग्याचें देऊळ गांठा—

मनोहरला त्या स्थितींतसुद्धां हसूं आलें.

" कां, हसलास कां ? आतां जरा हुशारी आली का ?" जनार्दननें विचारलें.

मनोहरनें उत्तरादाखल मान हालवली.

" होय ! आतां जरा बरं वाटतं. पण—मला जरा तुला एक विचारायचं आहे. मी सोलापूरचा खेडवळ म्हणून तूं हसणार नसशील तर—" म्हणून मनोहरनें त्याच्याकडे पाहिलें.

" आतां घरीं गेल्यावर तूं काय पाहिजे तें विचार. आधींच मला असला हा उशीर झालेला—अन् वास्तविक माझा त्यांत कांहींच दोष नव्हता. तुझ्या पत्राप्रमाणं मी अगदीं वेळेवर आलों असतों पण वाटेंत सायकलचं चाक झालं स्लिप अन्—तुला या खेडेगांवच्या लोकांची शहरांतून ऐसपैस चालण्याची ढब लवकरच कळेल म्हणा. जणूं काय रस्ते यांच्याच मालकीचे—थोडक्यांत

सांगायचा सारांश म्हणजे या सुप्रभातीं मी सायकलवरून हापटी खाली—" जनार्दन हसत म्हणाला.

" अन् मीहि पण—" मनोहर एकवार आपल्या पराक्रमभूमीच्या दिशे-कडे पाहत म्हणाला.

" म्हणजे ? हें काय नवीन लचांड ? "

" म्हणजे मी गाडींतून उतरतांना पडलों—" मनोहर म्हणाला.

" त्यांत काय आहे ? वुइल्यम् दि कॉंकरर असाच एकदां पडला होता—त्याचंच तूं अनुकरण केलंस—" जनार्दन म्हणाला.

मनोहरच्या अगदीं ओठांवर आलें होतें कीं सांगावें याला कीं, " वुइल्यम पडला—पण तो असा पुण्याच्या फलाटावर पडला नव्हता, कीं त्याच्या अंगावर कोणी असं ' टिकीऽऽट ' म्हणून खेंकसलं नव्हतं, कीं त्याच्या सामानाचं असं कुणी वजन केलं नव्हतं, कीं—" पण मनोहर पुणेंकर नव्हता तरी 'मान सांगावा जना; अन् अपमान सांगावा मना' ही म्हण त्याला अवगत होती. आणि मनोहर थोडासा जनार्दनवर रागावला होता. मनोहरनें आपल्या पत्रांत स्पष्ट लिहिलें होतें, कीं हा आपला पुण्याचा पहिला प्रवास होय. तूं जरूर स्टेशनवर ये. आणि रीतीप्रमाणें मावशीस नमस्कार वगैरे.

आशा ही, कीं मावशीला आपण स्मरतों आहोंत त्याप्रमाणें मावशी आपल्याला स्मरेल. निदान आपल्या गाडीची वेळ स्मरेल; आणि जनार्दनाला स्टेशनवर पिटाळील. मावशीच्या नमस्काराचें चीज झालें असतें पण मावशी-चा हा कार्टा—

पुनः मनोहर भिंतींवरच्यीं प्रथकनें पाहूं लागला. आणि त्याला आत्तां आठवलें, कीं आपल्याला चहा सोडल्याला आज दोन वर्षें झालीं आहेत—

" मी चहा मुळींच पीत नाहीं—" मनोहर घाईनें म्हणाला.

" तें आतांच दिसलं. तुम्हा लोकांना या चहा न पिण्याच्या शपथा एक कप पोटांत गेल्यानंतर सुचतात म्हणून बरं आहे—" जनार्दन म्हणाला.

" पण—मग—मी इथं कसा आलों ? " मनोहर गोंधळून म्हणाला.

" चालत, चालत आलास. तुला काय वाटलं, कीं मी तुला कडेवर घेऊन आलों ?—"

जनार्दन मोठ्यानें हसूं लागला. मनोहर जास्तच गोंधळांत पडला.

" मनोहर, तुला पुण्यांत चार लोकांमधें वागायचं असेल तर माझं ऐक. या शहरांत सहसा शपथा वाहूं नयेत. आणि यदाकदाचित् झालीच तशी दुर्बुद्धि तर त्या पाळण्याचा मोह आवरण्यांत शहाणपणा आहे. गनिमी कावा किंवा वारा वाहील त्याप्रमाणं आपण पाठ फिरवायची हें ब्रीदवाक्य तुला शिकलं पाहिजे. राष्ट्राला चळवळ पाहिजे?—अच्छा! ही घ्या चळवळ. नको चळवळ?—राहिलं. अजून तुम्हां सोलापुरकरांना आमच्यापासून पुष्कळच शिकायचं आहे—" जनार्दन म्हणाला.

" मला तें कांहीं माहीत नाहीं– मला तूं चहा कां पाजलास?" मनोहर निग्रहानें म्हणाला.

" पुन्हा तेंच! इतका वेळ मी काय ओरडतों आहे? चहा नको तर तुला काय मी बोंडल्यानें दूध पाजूं? दूध आणि पुणं! वाः! वेड्या!—तूं कोणत्या युगांत आहेस?"

मनोहरनें पाहिलें, कीं झाल्या गोष्टीला इलाज नाहीं. आणि या माणसापुढें बोलणें व्यर्थ होय! म्हणे शपथा पाळण्याचा मोह आवरला पाह्यजे—

" बरं, पण आपल्याला पुढील कार्याला लागलंच पाहिजे. घरीं गेल्यावर आणखी एक चहाचा डोस मारला म्हणजे—" जनार्दन उठून म्हणाला.

मनोहर पुन्हा चमकला. छेः! चहा शक्य नाहीं. मावशी माझें खास ऐकून घेईल. मनोहर जनार्दनवर संतापला होता तरी त्याच्या मदतीची त्याला गरज होतीच.

जनार्दननें टांगा ठरवला. मनोहर कातुकच करीत राहिला. बस्! दोन शब्द! अमका मारुती! अमकी पेठ! सहा आणे! यंव रे पठ्ठे!

आणि झालेला प्रकार आठवतांच मनोहरला हायसें वाटलें. आज बरोबर दहा वर्षांच्या अवधीनंतर त्याला आईची आठवण आली—अन् तीसुद्धां टांग्यांत बसल्यावर!

"आईऽऽग" मनोहरनें सहजच म्हटलें. जनार्दननें त्याच्याकडे आश्चर्यानें पाहिलें.

"कांहीं नाहीं! उगीच." म्हणून मनोहरनें त्याच्या मूकप्रश्नाला उत्तर केलें.

* * *

आणि एके दिवशीं एकाएकीं फुग्यांत वारा शिरला.

पुष्कळ लोकांचीं चरित्रें आपण वाचतों. तीं चरित्रें मोठ्याच लोकांचीं असतात असें कांहीं नाहीं. कोणीकडून तरी चरित्र झालें, म्हणजे झालें! कोणतें-हि चरित्र घ्या. प्रथमदर्शनीं त्या चरित्राचा नायक एक दुधखुळा, भेंगराळू, पेंगचट असा एखादा मॅडकॅप आढळून येतो. पण तोच पुढें कांहीं दिवसांनंतर (म्हणजे कांहीं पानें उलटल्यानंतर) समाजांतील बालविधवांची करुण स्थिति पाहून स्मृतिकारांच्या कुळाचा उद्धार करण्यास उद्युक्त होतो. तोच अस्पृश्यता निवारणाच्या गोष्टी बोलूं लागतो आणि तोच एखादे वेळीं असेंब्लीमध्यें बसलेला दिसतो. या त्याच्या स्थित्यंतराला काय कारण असावें? आपणांपैकीं सर्वांचीं चरित्रें लिहिलीं जात नाहींत (जो लिहील तो सपशेल बुडेल!) किंवा आपणा सर्वांजणाना असल्या बालविधवांची कींव येत नाहीं—किंवा आपण सर्वजण असेंब्लींत मावणार नाहीं—मग हे लोक मोठे होतात कसे? ह्यांच्या मोठेपणाचें कारण काय?

तर त्याला एक नांव आहे. इंग्रजीमध्यें त्याला Inspiration म्हणून म्हणतात. या लोकांना Inspiration येतें अन् ते मग मोठे होतात.

आणि तें इन्स्पिरेशन (किंवा दैवी वायु) मनोहरमध्यें एकाएकीं शिरलें. आणि साहजिकच इतर मोठ्या लोकांप्रमाणें मनोहर पण 'मोठा' झाला.

गोष्ट अगदीं साधी—पण परिणाम पाहा. कॉलेजांत वर्षाच्या कांठीं कांहीं ठराविक निबंध प्रत्येकाला लिहावेच लागतात. आणि मनोहरनें त्याप्रमाणें एक निबंध लिहिला. तो निबंध सरासरी १०० ओळी लिहावा लागतो. (बहुतेक मंडळी वर्षांतील सर्व निबंधांची मिळून एवढी बेरीज करतात म्हणा) पण मनोहरनें आपले पाय कॉलेजच्या ठराविक निबंधांत दाखवण्यास सुरुवात केली; आणि तपासणारा गृहस्थ बरेच दिवस निबंधांचा पाळणा हलवणारा असल्याकारणानें त्यानें या बाळाचे लांब पाय तत्काळ ओळखले आणि एका

निबंधावर जोरानें (एक अपशब्द उच्चारून) शेरा मारला —(स्वतःला कादंबरीकार म्हणून समजूं नका.)

हातांत वही पडतांक्षणींच मनोहरनें तो शेरा पाहिला. पण त्या वेळीं त्याला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. बहुतेक सर्व मोठे लोक असेच निगरगट्ट असतात.

पण घरीं आल्यावर जनार्दननें त्याची वही पाहिली. पहा कसा धाग्याला धागा लागत जातो तें. जनार्दननें तो शेरा वाचला.

" मनोहर, तूं तर अगदीं या फेलोच्या पाठीमागं हात धुऊन लागल्यासारखा दिसतो आहेस. बिचारा अगदीं डोक्याचे केस उपटण्यापर्यंत कावलेला दिसतो. माझ्या वहीवर मात्र तुझ्या उलट शेरा आहे. "वाङ्मय, मग तें कोणत्याहि देशाचं असेना--आमचं शत्रुपण पत्करण्यांत त्याला आनंद वाटतो--" जनार्दन वहींचीं पानें मोजूं लागला.

" आम्हीं कितीहि लिहिलं तरी यानं कां चिडावं ? " मनोहर म्हणाला.

" बाप रे ! तीन निबंधांना तूं तीन पानं अडवलीं आहेस—गरीब बिचारा फेलो ! बिचाऱ्याची परीक्षा पास होण्यापूर्वी सुखस्वप्नं किती गोड असतात ! फेलो झालं कीं महिना पन्नास-साठ रुपये; सिनेमा-नाटकं भरपूर; कपडेलत्ते टेसदार; एक कोरं सायकलचं मशीन; साधल्यास मार्गशीर्ष नाहीं तर वैशाख-ज्येष्ठ ! आणि तें कल्पनेचं सुख सत्यसृष्टींत असं उतरूं लागलं तर काय त्यानं करावं ? तूं फेलो म्हणजे काय एखादा वाचकवर्ग समजतोस ? वाचकवर्गाची गोष्ट निराळी असते. वाटेल तसं चित्र भरकटावं. पण वेळीं-अवेळीं ' सुज्ञ वाचकांस हें सांगणें नलगे' अशा तऱ्हेचं पालुपद दडपून दिलं, आणि सरतेशेवटीं नायक-नायिकेच्या पुढं होणाऱ्या मुलाच्या बारशाला आमंत्रण देऊन वाचकांची सप्रेम रजा घेतली, कीं मग कोणताहि वाचक कुरकुर करणार नाहीं. उलट पोरीबाळींना आनंदच होईल. पण फेलो म्हणजे कांहीं वाचक नव्हे—"

जनार्दननें बरेंच लांबवलें असतें--पण तो एवढ्यावरच थांबला. कारण आपलें भाषण श्रोतृवृन्दाला कोठपर्यंत समजलें आहे हें अजमावण्याकरतां थोडा वेळ थांबणें हें वक्त्याच्या हिताला धरून आहे.

" झालं का तुझं ?" म्हणून मनोहरनें त्याला प्रश्न केला.

" चिडलास पुन्हा. तुझ्या हिताचं सांगायला जावं तर तुला असा राग येतो.. माझं काय जातंय् ? निबंध म्हणून दीडशें पानांची कादंबरी लिहिलीस तरी माझी कांहीं ना नाहीं—" जनार्दन म्हणाला.

आणि याच वेळेला बाहेर थोडीशी पानांची सळसळ ऐकूं आली. पानें किंचित् हललीं. वायूची एक बारीकशी झुळूक खिडकीवाटे आंत आली. मनोहरला जाऊन ती भिडली. बस्! एवढा वारा पुरे. फुगा थोडासा हलला. किंचित् मोठा झाला. वायूची झुळूक आली तशी गेली पण तींतील थोडासा अणुरेणु भाग फुग्यांत शिरला !—

" बरं आहे—पाहून घेईन—" म्हणून म्हणत मनोहर पुन्हा विचारांत गढून गेला.

" ए बाबा,—माझ्यावर कां ? मीं काय केलंय् ?" जनार्दन हसत म्हणाला.

" एक दिवस येईल; त्या दिवशीं—पण बोलण्यांत अर्थ नाहीं. ह्या तुझ्या फेलोला माझी हांजी हांजी करायला लावीन आणि तो कुचेष्टेचा शेरा परत घ्यायला लावीन—तरच नांवाचा मनोहर—" मनोहर छाती फुगवून म्हणाला.

" सीताकान्तस्मरण जय जय राम—अन् टाळयांचा कडकडाट—" म्हणून म्हणत जनार्दन वही दूर भिरकावून देत उठला.

त्या दिवसापासून मनोहर जपान देशांतील एखाद्या निद्रिस्त ज्वलत्पर्वता-प्रमाणें इतस्ततः वावरूं लागला.

* * *

पण मोठेपण एक दिवसांत येत नसतें म्हणून म्हणतात. एवढा मोठा फुगा फुगणार, तो एका दिवसांत,—एका झुळकीनें कसा फुगेल ?

नवकोट नारायण म्हणून इनकम्‌टॅक्सकरतां पिपेंच्या पिपें ओतणारे पढे एका दिवसांत कांहीं एवढे मोठे झाले नाहींत. त्यांच्या चरित्रांत पाहिलें तरी हेंच दिसून येईल— " एके दिवशीं श्रान्त होत्साता आपला हा चिमणा बाळ ( म्हणजे आजचा दोंदल्या ! ) एक पैशाचे फुटाणे खाऊन बुधवारांतल्या एका दुकानाच्या फळीवर निजला—" हे सगळे लोक असेच एका पैशाच्या फुटाण्या-वर फुगलेले आहेत.

त्याचप्रमाणें आजचे वाङ्मयपंडित. म्युनिसिपालटीच्या दिव्याखालीं यांचा अभ्यास—( हें दिव्य आजकाल फारसें दिसून येत नाहीं. ) पण चिकाटी,

मनोधैर्य, असाधारण समतोलबुद्धि—वगैरे वगैरे गुण यांच्यांत खेचून भरलेले असतात.

मनोहरला हे धडे अजून गिरवायचे होते.

त्यांतल्या त्यांत लेखकाला अडचणी फार. पण मनुष्याची आपली एक समजूत आहे, कीं गोष्ट–गोष्ट म्हणजे काय? दौतभर शाई, एक टाक, अन् सात-आठ आण्यांचे कागद–किती गोष्टी पाहिजेत? बोला! यांत आहेच काय?

मनोहरनें उडी घेतली खरी, पण पूर्वीच्या फलाटावरच्या उडीप्रमाणें पुनः पूर्वविचार केला नाहीं. मनोहरनें केवळ त्या आचरट फेलोवर चिडून हें ध्येय कायम केलें. त्या फेलोची पची झाली पाहिजे. इतर मार्ग काय कमी होते?—

पाठीवर खडू मारावेत. वर्गांत हळूच खालीं मान घालून शिट्या वाजवाव्यात. रस्त्यांत भेटला तर खिदीखिदी हसून त्याची टिंगल उडवावी. बाकावर पुस्तकांनीं स्टँपिंग करावें. वर्गांत शक्य तितका वात्रटपणा करावा—आणि त्याच्याकडून खासगींत शरणचिठी घ्यावी. हे मार्ग मोकळे असतांना हा लेखकाचा आडमार्ग कां? पण शेक्सपीअरचें वाक्य खरें झालें पाहिजे ना? There is divinity—इत्यादि.

मनोहरला सर्वांत मोठी अडचण म्हणजे एक साडेपांच फूट उंचीचें जनार्दन या संबोधनाला चिकटलेलें मनुष्याचें पिलूं. जनार्दननें दुसऱ्या दिवशीं त्याच्या लिहिण्याच्या टेबलावर खडूनें लिहून ठेवलें, "इथं गोष्टी लिहून दिल्या जातील—" आणि वेळीं-अवेळीं त्यानें मनोहरच्या नाकांत—(पण नकोच तो शब्द!)

लेखक झाला म्हणून तो काय मनुष्य नाहीं काय? उद्यां एखादा कॉलेज-मधला तरुण केशकर्तनाचें दुकान काढूं लागला तरीसुद्धां त्याच्या कोणी फारसें वाटेस जाणार नाहीं. पण मनोहर लेखक होतों म्हणून म्हणतांच आपण ज्या-प्रमाणें एकाद्या कानफुटक्या 'कृतान्तकटकामलध्वजजरा' दिसूं लागलेल्या वृद्ध माणसाशीं 'बरं, तुझं म्हणणं खरं' अशा थाटांत बोलतों त्याप्रमाणें जनार्दन त्याच्याशीं वागूं लागला.

"मनोहर, आमच्या एकंदर घराण्यांत तुझ्यासारखा उद्योगी (?) क्वचित् सापडेल. आम्हां लोकांचं शिक्षण म्हणजे बेरजा, गुणाकार, भागाकार येथपर्यंत.

साहेबानं एखादी लठ्ठशी बेरीज स्वतःला येत नाहीं म्हणून पुढं टाकावी आणि आम्हीं तीं चुटकीसरशीं सोडवावी; यांत आमच्या कल्पनाशक्तीची अचाट भरारी काय दिसत असेल तेवढीच! पण तूं? प्रभो जगन्नाथा! असंच आहे. तुझ्यामुळं माझा गौरव होणारच. 'गांवींचे आम्ही लेंड-ओहोळ–तुझ्यासारख्याशीं मिळतां गंगाजळ, कागविष्ठेचे झाले पिंपळ—मग मला निंद्य कोण म्हणेल?' चालूं दे. गोष्टी लिही. मी शाईचा पुरवठा करीन. आपण मराठी बोलणाऱ्या जगाला बोटं चोखायला लावूं—" जनार्दन एके दिवशीं त्याला म्हणाला.

"तुझं जिव्हाशौर्य मात्र अचाट आहे—" मनोहर कागदाचा गठ्ठा बाजूला सारून म्हणाला.

"तीच माझी वडिलार्जित संपत्ति आहे. माझं बोलणं कुणी ऐकून घेत नाहीं म्हणून—"

"ऐकण्यासारखं त्यांत मूल्यवान फार आहे!—" मनोहर म्हणाला.

"—नाहीं तर साऱ्या जगाला—म्हणजे मराठी समजणाऱ्या लोकांना—मीं थक्क केलं असतं." जनार्दन म्हणाला.

"जगाची गोष्ट बाजूला करूं, पण मी मात्र पूर्ण थक्क होत असतों; आणि कागद घेऊन लिहायला बसलों असलों, कीं तुझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पाडावा असं वाटतं. जन्या! वाजवीपेक्षां फाजील संपत्ति साठविणाऱ्या चिक्कूवर जसा सरकारचा डोळा असतो तसा तुझ्यासारख्या फाजील बोलणारांच्यावरहि पाहिजे. आणि बोलण्याची कला एकट्याच्याच हातांत किंवा तोंडांत राहतां कामा नये—" मनोहर म्हणाला.

"तुझ्या हातांतली रक्कम माझ्या तोंडांत दे म्हणजे झालं—" जनार्दन म्हणाला,

"हें—हें काय बोललास तें तुझं तुझा तरी कळलं का? रक्कम कसली, तोंड काय, अन् हात काय?— कां आपलं वाटेल तें बडबडत सुटावं!" मनोहर म्हणाला.

"जाने दो भय्या! माझं बोलणं माझ्याच पुरतं. पण त्या तुझ्या त्या गोष्टीचं काय झालं?—"

मनोहरनें या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. कारण उत्तर देणार तरी काय ?

मनोहरनें चार गोष्टी लिहिल्या—

आणि चारीहि गोष्टी साभार परत आल्या.

अगदीं पहिल्या वेळेला व्यवहार सरळ घडला. मनोहरनें पुरेशीं तिकिटें लावून ह्या पत्रावळया धाडल्या आणि आठ दिवसांच्या आंत पुन्हा चुकलेलें वासरूं जसें आईकडे धाव घेतें त्याप्रमाणें तें बंडल मनोहरच्या हातांत आलें.

दुसऱ्या वेळेला मात्र जनार्दननें त्याला युक्ति सुचवली. मासिकाला एक वर्षभर वर्गणीदार होण्याचें आमिष पुढें केलें गेलें. सोबत मनि ऑर्डरनें रक्कमहि पण गेली. पण संपादक हंसानें रक्कम तेवढी गिळली आणि पुडकें मात्र जागा नसल्याच्या सबबीवर परत धाडलें.

तिसऱ्या वेळेला "मी एक होतकरू लेखक आहें. आपण नवीन लोकांना पुढं आणणारे असल्याचं आपलं धोरण पाहून—" वगैरे शर्करा त्या गोष्टी-भोंवतीं पेरली गेली. पण ही शर्करावगुंठित गोळी संपादकाच्या घशाखालीं उतरली नाहीं.

चवथी गोष्ट मात्र "शेवटचा भाग शोकपर्यवसायी आहे तो आनंद-पर्यवसायी करणें" या सूचनेबरोबर परत आली. पण लेखकाला "तुम्ही असंच करा अन् तसंच करा" म्हणून ज्ञान शिकविणारा इसम निव्वळ शत्रूप्रमाणें भासतो म्हणे——

आतां एकच मार्ग शिल्लक होता. आणि तो जनार्दनानें त्याला सुचवला होता. भर चौकांत एखाद्या उंचशा इलेक्ट्रिकच्या खांबावर उभे राहून हस्त-लिखितें वाचून दाखविणें हा तो मार्ग. मनोहरला हा विचार पसंत पडला नाहीं.

येथपर्यंत आपणांपैकीं बहुतेकजण पोंहोंचत असतात. परत आलेलीं हस्त-लिखितें पुढें मुलाबाळांना धडे म्हणून ठेवण्यांत येतात; आणि वाङ्मयसेवा तशीच राहून जाते.

अगदीं सामान्य लोकांप्रमाणेंच मनोहरची अवस्था होणार होती. पण अजून त्याला पैशाचे फुटाणे खाऊन दुकानाच्या फळीवर एक रात्र काढायची होती—— फुगा फुगायचा होता.

एके दिवशीं जनार्दनला संशय आला. अलीकडे सात-आठ दिवस कोणीहि खोलींत आलें असतां मनोहरचा हात बसकराखालीं कां? सकाळच्या प्रहरीं मनोहरच्या फूरहँड कंदिलाची अशी अवस्था कां? मनोहरच्या गादीभोंवतीं सात-आठ काड्याच्या पेट्या कशाला? अन् रोज याच्या खोलींत कापूस पिंजल्याप्रमाणें कागदांचा ढीग पडतो तरी कोठून?

अशी अवस्था होण्याला कारण दोन रोग आहेत. पहिला-,अन् मला वाटतें सर्वांत बडा म्हणजे प्रेम; अन् दुसरा लेखन. पण प्रेम म्हणावें तर मनोहर अजून बच्चा दिसत होता. लेखन म्हणावें तर इतके टप्पल खाल्लेला सामान्य मनुष्य पुन्हा त्या फंदांत पडेल हें जनार्दनला स्वाभाविक वाटेना.

सांगायला कांहीं हरकत नाहीं—मनोहर एक कादंबरी लिहीत होता.

मोठा गोड विचार! उद्यां त्या संपादकाकडे मनोहर जाणार,—जवळ जवळ तीनशें पानांचें बाड त्या ढेरपोट्यापुढें आदळणार,—ऐटींत त्याच्याकडे पाहणार (कां नाहीं?),—एक पाय टेबलावर ठेवीत, तोंडानें हलकेंच शीळ घालीत बाहेरून येणाऱ्या-जाणाऱ्या लेकांकडे तुच्छतादर्शक पाहून हसणार-आणि मग तो संपादक (परमेश्वर त्याला उदंड आयुष्य देवो!) सद्गदित कंठानें मनोहरला म्हणणार, "पंत, अहो पंत, माझं पामराचं थोडं तरी ऐकून घ्या. मी स्वतः भुक्कड आहे, माझं मासिक टिनपाट आहे. पण आपल्यासारख्यांनीं लेख लिहून जर मनांत आणलं तर या कन्हेरीच्या फुलाला गुलाबाचा वास आल्यावांचून राहणार नाहीं. संतसज्जनांबरोबर सात पावलं सहवास घडला तरी मुक्ति मिळते म्हणून तुम्हीच लेखक लेक म्हणता—पहा बुवा!"

संत्रें विकत घेण्याबद्दल हट्ट धरणारा पोरगा काय बोलतो आहे तें ऐकतों आहोंत अशा मुद्रेनें मग मनोहर किंचित् हसून उत्तर करणार-—"आच्छा! देखें गे! देऊं-देऊं. असें अगदीं उतावळे काय होता?"

मनोहरची लेखणी झरझर चालू होती. कविकल्पनेच्या भराऱ्या निर्जीव लेखणीला नामोहरम करूं पाहत होत्या.

मनोहर अडला, लेखणी थांबली, विचारांचा ओघ ओसरला होता. पुढें काय? भुताखेतांवर रामबाण उपाय म्हणजे मिरच्यांची धुरी; त्याप्रमाणें अडेल-

तद्वद्ध कल्पनाशक्तीला तपकिरीची चिमूट. तपकिरीचा चाबूकसुद्धां प्रतिभादेवीला अपुरा पडूं लागला. खरंच, मूड ( mood ) आल्याशिवाय कसें लिहिणार? मनोहरनें डोक्याला हात लावून पाहिलें. खिडकींतून दूरवर दिसणाऱ्या एका पडक्या घराच्या छपराकडे पाहिलें. दिव्याच्या ज्योतीकडे पाहिलें—छेः! उलट क्षणैक अंधता मात्र पदरांत पडली.

" Halo! मनोहर—काय चाललंय् रे?"

मनोहरनें चमकून दरवाजाकडे पाहिलें. दोन पायांचें जनावर हसत उभें होतें.

" अस्सं? कांहीं तरी लेखन?" जनार्दन पुढें होऊन म्हणाला.

· मनोहरनें कागदाचा भारा लपवला.

" लपवतोस काय रे? चिठ्याचपाट्या तर नाहींत कुणाला? संभाळ अं! तिकडे वडिलांनीं समजावं आहे बाळ मावशीच्या घरीं. अन् इकडे—तुम्हा लोकांचा काय नियम घ्यावा? कालच एकजण म्हणत होता, कीं कोणताहि लेखक म्हटला, कीं त्याच्या गत आठवणी फार असतात." जनार्दन सुपारी तोंडांत कोंबीत म्हणाला.

मनोहरनें एक उसासा सोडला.

" अँ? कांहीं नाहीं ना तसली भानगड? बाकी तसल्या भानगडींतून बाहेर पडण्यापेक्षां आंतच पडून राहणं तुला आवडायचं म्हणा! मनोहर!—अरे, कां जिवाचं असं रान करून घेतोस? माझं ऐक. असली तपश्चर्या करणारी मंडळी निराळी असतात. आपला लहान मुलांचा स्वभाव कसा खेळकर पाहिजे. प्रत्यक्ष तुकारामबुवासुद्धां 'लहानपण देगा देवा' म्हणून खेळायला मागत आहेत. चल ऊठ,—आज एक पॅरॅमाउंट कंपनीचा फक्कडसा सिनेमा आहे. तेवढाच मेंदूला विसांवा—" जनार्दन म्हणाला.

मनोहर एवढा मोठा सिनेमाचा शौकी पण त्या दिवशीं? —छेः!

जनार्दननें त्याला परोपरीनें विनवलें. नटीचें नांव पुढें केलें. जगांतल्या सर्व नटींपेक्षां ती जास्त पैसे कमावते म्हणून सांगितलें. तिच्या मालकीच्या चार

मोटारी आहेत म्हणून सांगितलें—आणि शेवटीं बरोबर आल्यास एक भाजलेल्या शेंगांचा पुडा देईन म्हणून वचन दिलें.

मोठीं माणसें फुटाणे खातात, शेंगा खात नाहींत !

त्या दिवशीं जनार्दन एकटाच शेंगा खायला चालता झाला. मनोहरचा मनोनिग्रह दांडगा होता. त्याच्या मूळ पुरुषाच्या हातून जी गोष्ट झाली नसती ती गोष्ट त्यानें करून दाखवली. विश्वामित्री गोत्राच्या मनोहरनें त्या नटीचा मोह आवरून दाखवला.

मनोहरनें आजपर्यंत भरकटलेल्या भारुडावरून मोठ्या प्रेमानें हात फिरविला. कसें एवढें लिहून झालें कुणास ठाऊक! पुन्हा हेंच लिहितां येईल का?

विसाव्या शतकांतला विश्वामित्र पुन्हा तपश्चर्येला बसला.—

* * *

तपश्चर्या फळाला आली. जवळजवळ दोन महिन्यांची कमाई ती !

पण अपेक्षेप्रमाणें जगांत जागृतीचीं कांहींच चिन्हें दिसेनात. मनोहरची आपली भोळी समजूत होती, कीं आज कादंबरी छापून बाहेर पडली कीं दुसऱ्या दिवशीं लोक भेटायला येतात. अन् मग नको हा ताप म्हणून बाहेरच्या बाहेर 'घरांत नाहींत' म्हणून त्यांना बोळवतांना मावशींचा जीव रडकुंडीस येतो.

तरी पण Charity begins at home याप्रमाणें popularity begins at home याचा अनुभव त्याला आला. होतां होतां मावशीला कळलें. जनार्दनच्या कारकुनीपेशाच्या वडिलांना कळलें, कीं मनोहरनें आपल्या घरीं दोन वर्षें राहून मातृभाषेचें पांग फेडले.—

नवराबायकोंत कोण वाद !

" पाहिलंस ? अग जातीचं असावं लागतं ! मला पहिल्यापासूनच वाटत होतं, कीं मनोहर कांहीं असा रेम्याडोक्या नाहीं. पण माझ्याशीं वाद घालण्याची तुझी खुमखुमी जाईल तेव्हां ना ? " बळवंतरावांनीं आपल्या पत्नीस म्हटलें. बिचारी कांहींच बोलली नाहीं. कारण तिनें असा वाद कधींच घातला नव्हता. आपण म्हटलेलेंच जें नाहीं तें खोडून कसें काढणार ?

" अग, बाळाचे पाय पाळण्यांत दिसतात. सहवासानं तरी आपल्या गाढवाला अक्कल सुचेल असं वाटत होतं. म्हणून रामभाऊंना मनोहरला आपल्याच घरीं ठेवण्याचा मीं आग्रह केला. पण कांहीं नाहीं. हिरा तो हिरा म्हणून चमकला अन् गारगोटी आपल्या पदरांत पडली. हूंः ! दोघेहि सारखेच. पण अंतर पहा ! आपल्या गाढवाला दोन वेळेला जेवायला लागतं, चहा लागतो अन् तुझी माझी दृष्टि चुकवून सिनेमाला जायला लागतं--" बळवंतराव म्हणाले.

" पण मग मनोहरसुद्धां त्याच्याबरोबर जातो—"

" अग पण त्यांच्यांतसुद्धां अंतर आहे. या लेखकलोकांना चार लोक पाहावेच लागतात. त्याशिवाय त्यांना Observation कसं करायला मिळेल ?—" बळवंतराव म्हणाले.

" म्हणजे काय करावं लागतं ?" मनोहरच्या मावशीनें प्रश्न केला. पण उत्तर मात्र मिळालें नाहीं.

मावशीला जनार्दनविषयीं थोडेंसें वाईट वाटलें. साहजिकपणें मनोहरचा थोडासा राग आला. पण मावशी मत्सरी नव्हती. जनार्दनला मात्र ती थोडेंसें बोलली—

" जनू,--थोडासा बाहेर कमी भटकलास अन् अभ्यासाकडे लक्ष दिलंस तर तुझ्या आई-बापांना कांहीं वाईट वाटणार नाहीं, बरं का !—" मावशी सहजच म्हणाल्या. जनार्दननें या रागाचा ताल तेव्हांच ओळखला. पण त्यानें त्याकडे लक्षच दिलें नाहीं. उलट त्याचें उत्तर आलें—

" आई, जगाची सगळी संपत्ति जरी माझ्यापुढं आणून ओतलीस तरी मी एकसुद्धां गोष्ट लिहिणार नाहीं. ( प्रत्येकजण असाच निश्चय करील तर---? ) माझं काय तूं घेऊन बसलीस ? अगदींच ठोंब्या नाहीं ना तुझा मुलगा ? बस् ! झालं तर. अग हजारांत एकच सुपुत्र जन्माला येत असतो. आतां आणखी एखादा मला भाऊ आणणार असशील—" जनार्दनचें वाक्य तसेंच राहिलें.

आणि मनोहरनेंहि पण मावशींची समजूत घातली.

" मावशी, खरं सांगतों,--आपला जनू नसता तर मीं एक पानसुद्धां लिहिलं

नसतं. जनू वरचेवर मला मदत करायला होता म्हणून तरी मला हें लिहितां आलं. एकट्याच्यानं का असलीं कामं पार पडत असतात!—"

मावशींचें तात्पुरतें समाधान झालें. पण जनार्दन मनोहरपेक्षां दोन गुणांनीं कमी आहे हें नक्की, हें वेड कांहीं त्यांच्या डोक्यांतून निघालें नाहीं.—

हा वरवरचा दर्शनी भाग झाला. अंगांत घालण्याच्या कोटालासुद्धां दोन बाजू असतात. वरचा दिखाऊ भाग आणि आंतला झांकून घेण्याचा भाग.

आपले वाडवडील (तरुण मंडळी त्यांच्याविरुद्ध कितीहि ओरडली तरी) खरोखरीच मोठे दूरदर्शी होते. आणि म्हणूनच त्यांना दुरून डोंगर साजरे ही म्हण आपल्याकरतां तयार करतां आली. पण आम्ही तरुण मंडळी ह्या जुन्या म्हणींचा फारसा उपयोगच करीत नाहीं.

लेखकाचा धंदा वरून सुरेख दिसतो. तुम्ही आम्ही म्हणतों—'नांव मिळतं, पैसा मिळतो, श्रम नाहींत—' आणि या समजुतीवरच भुलून आजची नवीन पिढी मातेच्या अंकावर पडल्या पडल्याच एका नवीन कादंबरीचे धागेदोरे विणीत असते. पण मनोहरला विचारा—

मुंबईची गाडी धरायची तर सुमारें तासाचा अवधि ठेवून घराबाहेर पडावें हा आपल्या वडील माणसांचा उपदेश. मनोहर संपादकाची गाठ घ्यायला दोन तासांचा अवधि ठेवून घराबाहेर पडत असे. आणि एखादे वेळीं पडलीच गांठ तर 'उद्यां या,' ही चाट!

करतां करतां एक संपादक भेटले. दोन्ही पक्षांमध्यें योग्य ते करारमदार झाले. टाईप कोणता टाकायचा तेंहि ठरलें. 'पायकाच ठेवतो' संपादक म्हणाले. लेखक मान हलविते झाले.

मनोहरचें पूर्वीचें स्वप्न तसेंच राहून गेलें. संपादकाचा झोक पाहतांक्षणींच लेखकमहाराजांनीं नांगी टाकली. आणि आतां कोण कुणाला पावन करणार हाच प्रश्न होता.

आतां जरा आपल्याला विषयांतर केलें पाहिजे. मनोहरनें अशी कादंबरी तरी कोणती लिहिली?

कादंबरीचें नांव "ठाणा लोकल!" पृष्ठसंख्या १८९. किंमत १ रु०, कागद

मोहरेदार, छपाई उत्कृष्ट. बांधणी मंडळाच्या नांवास साजण्यासारखी— हा एका वर्तमानपत्राचा अभिप्राय.

कादंबरी नवीन धर्तीची होती, प्रकरणें १७.

गोळाबेरीज ही:—दोन तरुण वीर ठाणा लोकलनें मुंबईस येत असतां वाटेंत कुर्ल्यास एक तरुणी एका वृद्ध दाईसह गाडींत शिरते. नायकाचें लक्ष साहजिकच नायिकेकडे जातें. पण वाटेंत कोळशाचा एकहि कण त्या नायिकेच्या डोळ्यांत न उडतां ती सुरक्षितपणें बोरीबंदरवर (कारण यापुढें गाडी अजून नेण्यांत आलेली नाहीं) उतरते. पण आमचा नायक मात्र हुशार आहे. जातांना आपलें एक लाकडी अलगूज तिच्या पोर्टमँटोवर हा विसरतो. ती मुलगी तें अलगूज घेऊन जाते. वर्तमानपत्रांतून जाहिराती जातात. एके दिवशीं नायकाला एका भरीतपूरच्या सर्वाधिकाऱ्याकडून निमंत्रण येतें. आणि उपरिनिर्दिष्ट ठाणा लोकलवाली त्याची मुलगी निघते. परस्पर ओळख होते. गंमत काय होते, तर नायिकेला एका शिक्षकाची फार जरूर असते आणि हल्लींचे तरुण शिकवण्या करायला नेहमींच तयार असतात.

आतां यापुढें कळस होतो (म्हणजे Climax होतो). दुय्यम नायक पांचगणीला हवा पालटायला जातो. नायकाचीं पत्रें दर आठवड्याला दहा रुपये पगारावर तरफडणारा पोस्टमन पांचगणीला पोंहोचवूं लागतो. त्यांत नायकाची मनःस्थिति सुरेख वर्णन करण्यांत आली आहे. आतां तो रोज तिला इंग्रजी सातवीचा अभ्यास शिकवायला जात असतो. मध्यंतरीं भरीतपूरचे सर्वाधिकारी आपल्या संस्थानांत एकटेच निघून जातात.

पुढें बरींच संकटें येतात. पण एके दिवशीं धीर करून नायक हा गुलाब पुष्पाला कुरवाळतो. जिकडे तिकडे आनंदी आनंद होणार; पण तिच्या वडिलांची संमति! नायक दुय्यम नायकाला तारेनें बोलावतो. आणि तोहि पण (आचरटच तो!) कल्याणच्या पुढें तारेच्या गाडीनें प्रवास करतो— त्या मुलीचे वडील येतात. संमति मिळते. आनंद होतो. अश्रूंचे पूर लोटतात. भरीतपूरचे दिवाण देवक बसविण्यासाठीं म्हणून एक शेरभर सुपारी कनवटीला खोंचण्यासाठीं खरेदी करतात. नायकाला नायिका मिळते. दुय्यम नायकाला दुसरी मुलगी कादंबरींत न आल्याकारणानें फक्त चार दिवस लाडूच काय ते मिळतात—

बस्स ! हें कथानक—साधें—सरळ—सुटसुटीत; पण नितान्तरम्य !

हल्लींच्या युगांत लोकांना गोष्टींमध्यें कांहीं तरी तत्त्वें भरलेलीं आवडतात. ध्येयप्रधान गोष्टी पाहिजेत म्हणे ! मनोहरच्या कादंबरींत केवढें मोठें ध्येय होतें ? त्या ध्येयाकरतां तर लाकडी अलगूज त्याचा नायक विसरला. त्या ध्येयप्राप्तीकरतां तर शिकवणी—अन् त्या ध्येयाकरतां ( ध्यानाकरतां ) तर ही इतकी आटापीट. याशिवाय त्यानें आणखी कांहीं गूढ तत्त्वें गुरफटून दिलीं होतीं.

नं. १ तत्त्व—तरुण मनुष्यानें नेहमीं खिशांत वा हातांत अलगूज म्हणा, बासरी म्हणा–निदान एखादी शिट्टी–असलीं वायुवाहक वाद्यें अवश्य जवळ बाळगावींत. वेळ कांहीं सांगून येत नाहीं. जास्ती माहितीकरतां 'ठाणा लोकल' पहा.

नं. २ तत्त्व—स्वतःच्या ध्येयप्राप्तीकरतां शिकवण्या करण्यांत कोणत्याहि प्रकारें लाज बाळगूं नये. जास्ती माहिती 'ठाणा लोकल'मध्यें पाहण्यास मिळेल.

नं. ३ तत्त्व—नायिकेला विचारण्यापूर्वी प्रथम तिच्या वडिलांचाच या गोष्टीसंबंधीं पिच्छा पुरवावा. म्हणजे मग 'ठाणा लोकल' मध्यें दिसून येणारा त्रास वांचेल.

नं. ४ तत्त्व—नेहमीं आसपास मित्र जमा करावेत; पण काळजी ही घ्यावी कीं, जेव्हां आपण शिकवण्या करीत असतों तेव्हां त्यांना प्रकृतीच्या सबबीवर पांचगणीची हवा दाखवावी.

इत्यलम् ! कोरून काढायला लागलें तर आणखी पुष्कळच मगज हाताला लागेल– आम्हांला आणखी एक नवीनपणाची झाक दाखवावयाची आहे. आपण मराठी कादंबऱ्यांतून अलीकडे इंग्रजी शब्द फार पाहतों. कैक वेळेला अशीहि भ्रांत पडते, कीं ही कादंबरी इंग्रजींत असून मराठींत लिहिली, कीं मराठी असून इंग्रजींत लिहिली ? त्याला नाइलाज आहे ! राज्यकर्त्यांची ज्याप्रमाणें झडप पडते त्याप्रमाणें भाषेचीहि पडणारच—पण त्यांत निव्वळ मराठी जाणणाऱ्यांची कोणीच सोय पाहत नाहीं !

मनोहर हें जाणून होता. त्यानें मुकाट्यानें पुस्तकाच्या खालीं इंग्रजी शब्दांचे अर्थ दिले होते उ०—'तिची ग्रेस ( Grace ) इतकी मोहक होती—'

याला टीप देणें ओघालाच आलें. पण 'ग्रेस' ह्याला मराठींत तसा अगदीं काटेकोर शब्द त्या वेळीं मनोहरला सुचला नाहीं. त्यानें नम्रपणें अज्ञान प्रकट केलें,—" मला सध्यां या शब्दाला प्रतिशब्द आठवत नाहीं. ज्याला हा शब्द अडेल त्यानं मला समक्ष भेटावं अगर खालील पत्त्यावर एक पत्र टाकावं. माझा पत्ता—" वगैरे.

महाराष्ट्रांतील वाक्पण्डितांनो ! टाका लेखण्या खालीं—

आणि विनोद ! भरपूर विनोद ! पण तो नवीन धर्तीचा. उदाहरण देणें बरें—

" भरीतपूरचे दिवाण तें अलगूज हातांत घेऊन म्हणाले, 'काय हो, हें कसं वाजतं.' नायक उत्तर करतो, 'वारा फुंकला म्हणजे तें वाजतं.' यावर दुय्यम नायक पुढं होऊन म्हणतो, 'अहो, आपण फुंकणींत नाहीं का वारा फुंकत त्याप्रमाणं ! ' सर्व मंडळी ( दाराआडून ऐकणारी नायिका धरून ) खोः-खोः हसूं लागली."

यांत कुणाला नांवें ठेवायला जागा सापडेल ?

कादंबरीला रीतीप्रमाणें प्रस्तावना होती, अर्पण-पत्रिका होती ( ती. वडिलांच्या नांवें ), अनुक्रमणिका होती सर्व कांहीं होतें. ग्रंथकर्त्याचा फोटो मात्र नव्हता. 'एक्स' रेच्या शोधानें ज्याप्रमाणें मांसाच्या पलीकडील हाडेंसुद्धां दिसतात त्याप्रमाणें यापुढील लेखकांनीं पाठमोऱ्या पाहिलेल्या तरुणीचें नाक चाफेकळी आहे, का फुललेल्या गुलाबासारखें बसकें आहे हें अचानक कसें सांगावें याचाहि मनोहरनें धडा घालून दिला होता.

पण इतकें करून सुद्धां लोक भेटायला येईनात तेव्हां प्रश्न पडला कीं, या देशाला म्हणावें तरी काय ?

* * *

लोकप्रियता गोगलगाईच्या पावलानें चालत आली. सहजच कॉलेजांत एकानें ( टवाळी करण्याच्या उद्देशानें )—काय हो कुळकर्णी, तुमचीच का ती 'ठाणा लोकल ? ' म्हणून प्रश्न टाकला. मनोहरनें खालच्या मानेनें उत्तर केलें, 'हो.'

एकदां 'भूत' पत्रांत पुस्तकाची जाहिरात आली. इतर लोकांचे फुगवा-फुगवीचे आंकडे जरी बाजूस केले तरी साधारणपणें दहा हजार लोक तरी

'भूत'-पत्र वाचीत असतील. त्या मानानें पाहतां दहा दुणें वीस हजार डोळ्यांच्या खालून ' मनोहर रामचंद्र कुळकर्णी ' हें नांव गेलें असावें. आणि एक वर्तमान विकलें गेलें कीं, तें वाचणारे आणखी चारजण फुकटे असतातच. म्हणजे हे पुन्हा ऐंशी हजार डोळे! मिळून एक लाख डोळ्यांखालून मनोहर फिरला.

मनोहरनें आतां मात्र एक छानदारशी टोपी विकत घेतली. एकदां फुग्यांत वारा शिरला म्हणजे मग फुग्याचा रंग थोडासा पालटणारच.

एकदां मनोहर रात्रीचा निजला आणि सकाळीं उठून पाहतो तों दाराशीं एक मनुष्य उभा. 'भूत' पत्राचा बातमीदार म्हणून त्या भुत्यानें आपलें व्हिजिट कार्ड धाडलें. त्याचा हेतु कळतांच जनार्दननें सुरुवात केली—

" मुलाखत? या-या; अवश्य या. अहो, तुमचीच तर आम्ही वाट पाहत होतों." जनार्दन हसत म्हणाला.

" त्याचं कांहीं तुम्ही ऐकूं नका—" म्हणून मनोहरनें त्या भुत्याची समजूत घातली.

" पण तुमच्यापैकीं मनोहर रामचंद्र कुळकर्णी कोण?" बातमीदारानें उभ्याउभ्याच विचारलें.

" मी कादंबरीकार दिसतों का तुम्हांला? माझे डोळे तुम्हांला एखाद्या कादंबरीसारखे पिंगट दिसतात का? वेड लागलेल्या माणसासारखे मी हातवारे करतों आहे का? माझी मान एखाद्या बगळ्यासारखी उंच निघाली आहे का? नाहीं; महाशय, ह्या देहाला कुलकर्णी हें आडनांव चिकटलेलं नाहीं. आणि लेखकपणाचा धंदा या जन्मीं तरी या हातून घडेलसं दिसत नाहीं. तें तुमचं भक्ष्य! घाला उडी!" जनार्दन म्हणाला.

मनोहरनें कांहीं एक न बोलतां त्या आगंतुकाला एक खुर्ची बसण्यास दिली. पण खुर्चीचा उपयोग बसण्याकडे करतात हें त्या पठ्याला माहीत नव्हतेंसें दिसलें. तो खुर्चीवर पाय देऊन उभा राहिला. मनोहरनें थोडक्यांत जनार्दनची ओळख करून दिली.

"अस्सं! अस्सं! यांची वाचाशक्ति आणि आपली लेखनशक्ति! वा:! सम-समासंयोग कीं जाहला!" जनार्दनकडे पाहण्याचें टाकून बातमीदार म्हणाले.

"उगीच एवढं वाचाशक्ति म्हणून मोठं नांव कशाला देतां? तोंडाचा पट्टा म्हणून म्हणानात—" जनार्दन म्हणाला.

"जरा थांबा हं—" म्हणून म्हणत बातमीदारानें आपल्या नोटबुकांत नोंद करण्यास सुरुवात केली.

"डोळे पाणीदार, नाक सरळ—चेहऱ्यावर असाधारण शांतता विराजमान झालेली. आसमन्तात् कादंबरीकारास साजेसे विनोदाचे अखंड प्रवाह वाहत आहेत. डोक्यास टोपी असल्यामुळें शेंडी बहुतेक असेल किंवा बहुतेक नसेल. राहणी साधी—उच्च विचार—" मनोहरनें जनार्दनास खूण केली. आपल्यासाठीं इतके श्रम घेणाऱ्या जिवाला चहाशिवाय जाऊं देणें केव्हांहि शिष्टाचाराविरुद्ध आहे. जनार्दन मुकाट्यानें खालीं गेला.

"हं–आतां आपण अगदीं मन मोकळं करून बोलूं या. लोकांना मुलाखती फार आवडतात. कारण मोठ्या माणसांच्या लहान गोष्टी वाचण्यांत कुणालाहि आनंदच होणार. अगदीं बारीक गोष्ट त्यांना सांगितली पाहिजे. ज्याप्रमाणं लोकमान्यांचा अडकित्ता वगैरे वगैरे." पेन्सिल कानावर ठेवून महाशय म्हणाले.

मनोहरनें 'समजलें' या मुद्रेनें त्याच्यांकडे पाहिलें. इतक्यांत महाशयांनीं खिशांतून काड्याची पेटी काढली, आणि खिसे तपासण्यास सुरुवात केली पण सिगारेट कांहीं सांपडेना.

"थांबा हं. कोपऱ्यावरून एखादं पाकीट घेऊन येतों," म्हणून बातमीदार-साहेब जाऊं लागले.

आतां विचार करण्यासारखी गोष्ट आहे. कधीं नव्हत असा बातमीदार आपल्याकडे मुलाखत घ्यायला येतो. मनुष्यस्वभावास धरून असलेल्या विसरभोळेपणामुळें काड्याची पेटी आणतों. पण सिगारेट आणण्याचें विसरतो. असल्या देवमाणसाला तुम्ही सिगारेट आणायला कोंपऱ्यावर जाऊं द्याल का? अन् समजा कोपऱ्यावर गेला अन् हवेंत वितळून गेला तर? किती तरी लोक असे हवेंत वितळतात. जरा जाऊन येतों म्हणून म्हणतात ते पुढल्या जन्मांत केव्हां तरी भेटले तर भेटतात. मनोहर इतका खुळा नव्हता. आणि घरांत

मावशीच्या नवऱ्यानें सिगारेटचा यज्ञ आरंभल्यास आज जवळ जवळ दहा वर्षें होऊन गेलीं होतीं. या भिक्षुकाच्या समिधा त्या भिक्षुकाला चालतात.

" थांबा, त्याची व्यवस्था मी करतों--" म्हणून म्हणत मनोहर चालता झाला.

तो येईपर्यंत बातमीदारानें आपल्या नोटबुकांत लिहिलें—

" नखशिखान्त दाक्षिण्य.—आल्या प्रसंगाला तोंड देण्याची समय-सूचकता ! "

मनोहरनें बरोबर एक पन्नास समिधांचें डबडें आणलें. बरोबर जनार्दनहि पण आला.

" आतां आपण कामास सुरुवात करूं. मला प्रथम आपल्या कुळाची सर्व साधारण माहिती पाहिजे." सिगारेटच्या धुराआड लपलेल्या सूर्यानें विचारलें.

" का हो,—कुळाचा उद्धार अवश्यच आहे का ? " जनार्दननें मध्येंच तोंड घातलें.

"हा तुमचा विनोद झाला. कुळाची माहिती अशाकरितां, कीं इतर आनुवंशिक संस्कारांप्रमाणें लेखक हाहि एक आनुवंशिक गुण आहे कीं काय हें अजमावून पाह्यचं. हें पाहा, सुपुत्र जन्माला आला, कीं पुढच्या आणि मागच्या अशा बत्तीस दुणें चौसष्ट कुळांचा तो उद्धार करतों." भूतानें म्हटलें.

" पण हें पाहा—आपल्या खाजगी गोष्टी चवाट्यावर आणणं हें मला तरी पसंत नाहीं." जनार्दन म्हणाला.

" अन् मला पसंत आहे वाटतं ? पण करणार काय ? प्रसिद्ध पुरुषाला आडबाजू कशी मिळणार ? एखादा प्रतिभासंपन्न लेखक पुढं आला, कीं वाचक-वर्गाला तहान लागणारच. त्याचे वडील लेखक होते का ?—त्याचे आजोबा लेखक होते का ?-- त्याचा मूळ पुरुष लेखक होता का ?—ही अशी लांबण लागते. आणि आपल्याला त्यांच्यापुढं सत्य तेंच मांडावं लागतं. जनता-जनार्दनापुढं लपंडाव चालणार नाहींत—" दुसरी सिगारेट पेटवीत बातमीदार म्हणाले.

" जनताजनार्दन म्हणजे भूतवर्तमानपत्राचे लोक आणि त्यांच्या कच्छपीं असणारे चार कुटाळखोर लोक असंच ना ?" जनार्दन म्हणाला.

" आतां ह्या तुमचा विनोद नाहीं. ह्याला Satire म्हणतां येईल. तुम्ही विनोद सोडूं नका." बातमीदारानें जनार्दनावर फुगटून म्हटलें. मनोहर मध्यें पडला.

" जाऊं द्या. तो वाद कशाला ? मी सांगतों. आमच्या पूर्वींच्या लोकांत कोणी कादंबरी लिहिली असावी असं मला वाटत नाहीं—" मनोहर गंभीरपणें म्हणाला.

" There you are. म्हणजे ही स्वयंस्फूर्ति म्हणायची—" वहीचीं पानें झरझर सरकलीं.

" गंगेला मूळ नाहीं—ऋषीला कूळ नाहीं—स्वयंस्फूर्ति.–" वहींत नोंद झाली.

" अहो, पण गंगेला मूल नाहीं म्हणून काय लिहिता ? " जनार्दन हसून म्हणाला.

" तो दृष्टिप्रमाद आहे. माझा 'ल' आणि 'ळ' बहुतेक सारखेच असतात." बातमीदार जरा आढ्यतादर्शकतेनें वहीकडे पाहून म्हणाले.

" त्यांत काय आहे ? मी स्वतः 'ह' आणि 'द' बहुतेक सारखेच काढतों." मनोहरनें कबूल केलें.

पुन्हा वहींत नोंद पडली—" मनुष्यस्वभावास अनुसरून घडणारे हस्त-प्रमाद–'ह' आणि 'द' यांचा सारखेपणा—Human Touch."

दुसऱ्या दिवशींच्या 'भूत' पत्रानें जनतेला चांगलीच जागी केली.

प्रथमतः मनोहरच्या वडिलांना त्यानें जागें केलें,—" पहा— हे आपले चिरंजीव. असला चिंतामणि उत्पन्न करणारे आपण ढीग आहांत. पण महाराज, याचं श्रेय तुम्हांला नाहीं; तुमच्या वडिलांना नाहीं; तुमच्या आजोबांना नाहीं; तुमच्या मूळ पुरुषाला नाहीं; ही स्वयंस्फूर्ति आहे. ह्या प्रतिभेचा उगम आपल्या-पासून नाहीं. तो सहजगत्या आलेला आहे. आतां यापुढं तरी आपल्या चिरंजिवांना त्यांच्या योग्यतेस साजेसं जपा— " अन् 'भरपूर पैसे पाठवीत जा' म्हणून जनार्दन मनाशींच पुटपुटला.

अखिल जगाला (म्हणजे फक्त मराठी वाचतां येणाऱ्या अन् वाचलेलें समजणाऱ्या जगाला) 'भूत' पत्रानें सांगितलें,— "जनताजनार्दना, हा माझा नारळ स्वीकार. आजवर कानाकोंपऱ्यांत सडून कुजण्याच्या मार्गास लागलेलं हें फळ मी तुझ्या ओटींत घालतों. देवा, याचा स्वीकार कर. ओसाड रानांत उगवणारं हें एकटंच फूल उद्यानांत आणून लावलं आहे. हें सुखरूप वाढो.

आणि हे असे दैदीप्यमान सूर्य वाङ्मय-नभोमंडळांत चमकत असतांना मराठी भाषा मृत्युपंथास लागली आहे हें म्हणणं म्हणजे कोण हा वस्तुस्थितीचा विपर्यास होय ! नाहीं–कदापि नाहीं–तिळमात्र नाहीं–त्रिवार नाहीं ! मराठी भाषेंत असल्या वाङ्मयाची उणीव आहे हें मात्र कबूल—पण असल्या उत्साही तरुणांनीं पुढं येऊन ती उणीव अंशतः दूर करण्याचं मनांत आणलं आहे याबद्दल आम्ही त्यांचं अभिनंदन करतों—ज्या वेळीं—"

पण पुरे. कुठल्याहि मुलाखतीखालीं बरेंचसें आणखी असलें चऱ्हाट लांबवलेलें दिसून येईल.

काय असेल तें असो, मनोहरला लाज वाटूं लागली. आपण मुलाखत दिली नसती तरी बरें असें त्याला राहून राहून वाटूं लागलें. आपण थोडेसे मोठे असूं कदाचित्. आपण नवीन धर्तीची कादंबरी लिहिली आहे हेंहि तो जाणून होता. आणि आपल्याप्रमाणें अगदीं बोटावर मोजण्याजोगे जातिवंत लेखक सापडतील हेंहि त्याला कळून आलें. पण–पण तें 'वाङ्मयनभोमंडळांत चमकणारा दैदीप्यमान सूर्य' हें कंत्राट त्याला पटेना.

जनार्दननें त्याची समजूत घातली— "जाऊं दे रे मनू, कोणीं सांगावं असेलहि तुझा तसा गुण ! बरेच दिवस आपली आपल्यालाच भ्रान्त पडते कैक वेळीं. जन्मल्यानंतर सुमारें पांच वर्षेंपर्यंत बोलण्याची कला आपल्याजवळ असेल ही कल्पनासुद्धां मला शिवली नाहीं. पण आतां पहा. तूं सुद्धां मला एखादं शिफारसपत्र लिहून देशील."

पण ह्या मुलाखतीचा शेवट आणखी एक दिवसानें झाला. दुसऱ्याच दिवशीं बळवंतरावांनीं खिशांतल्या सिगारेटा संपल्या म्हणून डबडें शोधण्यास आरंभ केला. बराच वेळ एकट्याच्या हिमतीवर त्यांचे प्रयत्न चालू होते. शेवटीं त्यांनीं मोठ्या कष्टानें जिवाभावाला करून आणलेली सहधर्मचारिणी

मदतीला घेतली. दोघांनीं मोठ्या कसोशीनें घर शोधलें. जनार्दन आल्यावर त्याला विचारलें. त्यानें मनोहरकडे बोट दाखवलें.

मनोहरनें बातमीदारपंत निघून गेल्यावर डबा तसाच उचलून आपल्या ट्रंकेंत टाकला होता. डबा हातांत पडतांच बळवंतरावांना सोन्याची खाण भेटली. पण लगेच ते ओरडले,—

" अरे डबा गच्च भरलेला होता. अन् साऱ्या चारच शिल्लक आहेत—"

मनोहरनें जनार्दनकडे पाहिलें. जनार्दननें मनोहरकडे पाहिलें.

पण मनुष्यांचें वैभव देवांना बघवत नाहीं. कोणताहि मनुष्य जरा थोडासा पराक्रम दाखवूं लागला कीं, वर देवांची कमिटी भरते. सूचना-उपसूचना मांडल्या जातात, ठराव होतात आणि एखादा पराक्रमी योद्धा स्वारीवर निघतो.

अगदीं थेट आपल्या राज्यकर्त्यांचा कित्ता. " तुमच्या संस्थानचा कारभार नीट नाहीं. रयतेची फारच हीनावस्था आहे. रयत फार कागाळ्या करूं लागली आहे." या सबबीवर उडत्या पांखरांचे पंख कायमचे तोडून तरी टाकायचे किंवा त्यांची मुंडी निकालांत लावायची.

आपणच त्यांना निर्माण करायचें आणि आपणच त्यांना मारायचें. काय न्याय आहे ! मनुष्यानें अशी हत्या केली तर शिक्षा—अन् देवरायाला !—

मनोहरचा फुगा किमान मर्यादेपर्यंत ताणला गेला होता.

वारा आला कीं झाडें डोलूं लागतात, पानें सळसळूं लागतात, धुराळा उडतो. आणि त्यांत एखादें कुसळहि असूं शकतें. तें कुसळ नेमकें फुग्यांत शिरतें आणि मग त्यापेक्षां मुसळ बरें असें म्हणण्याची पाळी येते. कारण मुसळ डोळ्याला दिसतें पण कुसळ (अर्थात् आपल्या डोळ्याविषयींच मी बोलतों आहे.) दिसणें अशक्य असतें. अगदीं डोळा फुटला तरी कुसळ दिसत नाहीं. आणि तें कुसळ डोळा फोडणारच. तेंच तर त्याचें काम !

जनार्दननें मागें एकदां सहजच म्हटलें होतें. चिठयाचपाट्या का असेंच कांहीं तरी तो बडबडला. बस् ! तेंच तें कुसळ ! काय पण वर्मी घाव देवांनीं घातला होता !

आणि सुरुवात पहा कशी होते. तुम्ही आपल्या घराची खिडकी उघडतां सहजच. तुम्ही तिच्याकडे सहजच पाहतां. ती तुमच्याकडे अगदीं सहजच पाहते. कुठें तरी मुद्दाम केल्याचा भाग दिसतो? पण मग तुम्हांला त्यापुढें रोज खिडक्या उघडण्याचा नाद लागतो. असेंहि वाटूं लागतें, कीं आपल्या घराला भिंतींऐवजीं सगळ्या खिडक्याच कां केल्या नाहींत? आणि समोरच्या भिंतीआडहि पण अगदीं हाच विचार थैमान घालीत असतो.

मग खिडकीवाटे तत्त्वज्ञान सुचूं लागतें. भर थंडींतसुद्धां घरामध्यें कसें अगदीं कोंडल्यासारखें होऊन जातें. जरा खिडकींत बसलें कीं कसें अगदीं 'हुश्श' वाटायला लागतें. अभ्यास मोकळ्या हवेशीर ठिकाणींच चांगला होतो. टेबल खिडकीशीं येतें; आणि कुठेंसें म्हटलें आहे ना, कीं ज्याला डोळे शाबूत ठेवणें असेल त्यानें वाचतांना मधून मधून दूरवर पाहण्याचें करावें? आणि दूरवर पाहवें तों दृष्टि शाबूत राहणें दूरच, पण डोळे दिपून एखादे वेळीं अंधता मात्र पत्करावी लागते.

मनोहर स्वतःला विसरला. आपली जगांतली मानमान्यता विसरला. आपण एक दैदीप्यमान सूर्य आहोंत ही जाणीव तो विसरला. डोळे असून तो आंधळा झाला.

पण मनोहर आंधळा झाला म्हणून जनार्दनचे कांहीं डोळे फुटले नव्हते. एके दिवशीं त्यानें सूर्य-जयद्रथ एके ठिकाणीं पकडले. समोरच्या घराची खिडकी पटकन् लावली गेली.

"का रे मनोहर,—इतका वेळ समोरची खिडकी उघडी होती अन् मी आपल्या खिडकींत येतांक्षणींच हा असा प्रकार कां?" जनार्दन हसतच म्हणाला.

या वेळीं कोणत्याहि तरुणानें उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं असतीं. नाना थापा मारल्या असत्या. पण मनोहरनें शान्तपणें आपल्या मनःस्थितीचें वर्णन केलें. जनार्दन ऐकत होता.

"आतां तिची तुझी बोलाचाली व्हावी असें वाटत असेल तर त्याला एक युक्ति आहे." तो म्हणाला. मनोहरचे कान नव्हे तर डोळेसुद्धां ती युक्ति ऐकण्यास तयार होते.

" तूं स्वतः एक कादंबरीकार आहेस. तेव्हां तुझी नायकनायिका लागेल तसं भरमसाट बोलूं शकतील. पण इथं मात्र तें शक्य नाहीं. गोष्टीमधें जवळ अल्गूज वगैरे यंत्रं वाळगलीं तरी काम भागतं; पण सत्यसृष्टींत तुला ढेकण्याच बाळगल्या पाहिजेत." जनार्दन हसून म्हणाला. मनोहरला हें गूढ उकलेना.

" सांगतों. ती मुलगी रोज सकाळीं ढेकण्या आपटायला रस्त्यांत येते. तूंहि पण त्याच वेळेला आपल्या घरच्या ढेकण्या घेऊन रस्त्यांत जा. झालं काम ! दोन समव्यवसायी एके ठिकाणीं आले, कीं केव्हां ना केव्हां तरी वाचा फुटणारच ! " जनार्दन म्हणाला.

" टिंगल करतो आहेस." मनोहर खिन्न मुद्रेनें म्हणाला.

" राहिलं. मग असेच खिडकींतून उसासे सोडीत बसा. महाशय, सामर्थ्य आहे चळवळीचें. उगीच स्वस्थ हातपाय जोडून का कुठं असल्या भानगडी मिटत असतात ? " जनार्दन म्हणाला.

" पण तूं कांहीं तरी भलतंच सांगतो आहेस. प्रसिद्धीस कसा येऊं म्हणून एखाद्यानं सल्ला घेतांच तुझा सल्ला काय तर म्हणे हातावर चालत जावं ! " मनोहर दीनमुद्रेनें म्हणाला.

" काय आश्चर्य आहे पहा. मनुष्य कितीहि सुधारला तरी प्रेमाच्या कुलंगड्यांतून वाट कशी काढावी हें कांहीं त्याला अजून सुधरत नाहीं. पुन्हा आपलं कुक्कुल बाळ ! देवा, हें प्रेम जर असं डोळे फाडणारं असलं तर मला आपला लवकरच ने कसा—" जनार्दन हसून म्हणाला.

फुगलेल्या फुग्यांत अजून तें कुसळ फिरत होतें.

* * *

आणि एके दिवशीं फुगा फुटला. बराच वेळ गुंतून राहिलेलें कुसळ विजयी झालें. फुगा फुटला—पण मनोहरला तें कांहीं काळपर्यंत कळलें नाहीं. एखाद्या उंचशा जागेवरून आपण उडी मारली असतां उडी खालीं आली तरीसुद्धां कांहीं वेळपर्यंत आपल्याला अजून आपली ही उडीच आहे असा भास होत असतो. फुगा फुटल्यानंतर कांहीं वेळपर्यंत आपला वस्तुस्थितीवर विश्वासच बसत नाहीं. अजून फुगतोच आहे ही आपली समजूत.

उपरिनिर्दिष्ट कुसळ मनोहरच्या घरीं आलें.

ह्याला कारण जनार्दन. वाचेचा फटकळ पण कृतीनें प्रेमळ. त्याचीच ही खटपट.

शेजारची 'बनी' काय शिकत असते? —तिला भाऊ किती आहेत? तिचें लग्न केव्हां करण्याचा विचार आहे?—इत्यादि गोष्टींचा त्यानें आपल्या आईकडून छडा काढला.

प्रथम प्रथम शिळोप्याच्या गप्पा या सदराखालीं हे प्रश्न खपले गेले. पण बायकांची जात कांहीं अशी शिळोपी नाहीं. मनोहरच्या मावशीनें सरळ जनार्दनला प्रश्न टाकला—

"कोण? मी? त्या शेंबड्या पोरीशीं? आई, मी कसा बरं लग्नाला तयार होईन? माझ्या आईची माया मला पुरे आहे. तुझ्या बहिणीच्या पोराकरतां माझा जीव तडफडतो आहे. त्याला बिचाऱ्याला मातृप्रेम नाहीं तेव्हां म्हटलं निदान पत्नीप्रेम तरी—" इतक्यांत मनोहर खालीं आल्यामुळें तें तसेंच राहिलें.

मावशीला ही परोपकारबुद्धि प्रथम पटली नाहीं. तिनें पुन्हा संधि साधून प्रश्न टाकला.

"जनू,—तूंच असं म्हणूं लागलास तर मीं काय करावं? तिकडे विचारायची तर सोयच नाहीं. ते तुझ्याकडे बोट दाखवतात अन् तूं असं करतोस! लोकांचीं मुलं पहा—" मावशीच्या डोळ्यांना पाणी आलें.

"आई,—मी थोडासा व्यापारी दृष्टीचा मनुष्य आहे. व्यापाऱ्याची दृष्टि ही, कीं बाजारांत भाव आला कीं मग विक्रीला माल काढायचा. आहे ह्या दरानं मी हजाराला विकला जाईन. थोडी थांब, आणखी दोन वर्षांनीं हीच किंमत दोन हजार होईल." जनार्दननें तिची समजूत घातली.

"पैशाला रे काय तोटा? मुलगी पाहिली पाहिजे. बनी म्हणजे कशी सोन्यासारखी—"

"पण आई, सोन्याच्या चिपा का आपण पानांत घेऊन बसत असतों?—"

पुढें मावशीला पटलें. मनोहरचें लग्न झालें, कीं मुलगी सासरपणाला आपल्याच घरीं येणार.

बळवंतरावांचा मुलगा आणि पत्नी आठवड्यांतून एक दिवस तरी समोरच्या घरांत पायधूळ झाडूं लागले. आणि हें प्रकरण पुरुषवर्गापर्यंत गेलें.

बनीच्या आईनें तर विहिरींत उडी टाकण्याचा धाक घातला. इकडे बळवंतरावांना एक शब्द पुरे होता. त्यांनीं रामभाऊंना एका पत्रांत (जनार्दननें लिहिलेलें, हे रावसाहेब सहीचे मालक) साद्यंत हकीकत कळवली. अन्—

जनार्दननें मनोहरपाशीं पेढे मागितले.

गोकुळांतल्या श्रीकृष्णाप्रमाणें मनोहरला युवतींचा गराडा पडला. कुणी त्याच्या डोक्याचे केस उपटले. कोणी त्याच्या कानांवरून हात फिरवले. कुणी त्याला तीट लावली. कुणी त्याला कपडे घातले. नाना तऱ्हेनें त्याला छळलें. बिचारा कादंबरीकार— पुष्कळ मोठा असला म्हणून असल्या प्रसंगीं मुंडावळयांचे मणी मोजल्यापलीकडे काय करील? उपरण्याला गाठ जावई-बुवा— बरं बुवा उपरण्याला गाठ. हात धरा— धरला. उठून उभे राहा— राहिलों. आणखी कांहीं?— मोठेच कष्ट पडत असतील कीं नाहीं एका पोरीचा हात धरायला? काय ती मुद्रा,— काय तो आवेश?—

जनार्दन सर्व ठिकाणीं फिरत होता. आत्याबाईची पलटण जागी करण्या-पर्यंत त्याची तयारी होती. लेकुरवाळया माउलींनीं तर पणच केला होता. Until called for म्हणून पोस्टामध्यें ज्याप्रमाणें एखादें पार्सल मालकाची वाट पाहत पडून राहतें, त्याप्रमाणें त्या माऊली आपली बाळगोपाळ मंडळी निजवून थोपटून त्याच्याकडे आणून टाकीत— आणि जनार्दन मनांतल्या मनांत विधात्याचें कौतुक करीत त्यांच्याकडे पाहण्याचें कबूल करी.

सिगारेटची भानगड उकरून न काढण्याचें ठरवून 'भूत' पत्राच्या बातमी-दाराला बोलावणें करण्याचें मनोहरनें जनार्दनला सुचविलें. जनार्दननें तेंहि घडवून आणलें.

गृहप्रवेश यथाविधि पार पडला. दारीं येणाऱ्या लक्ष्मीनें अधोलीला पाय लावून उंबऱ्याच्या आंत येण्याचा प्रघात असतो. काय झालें कुणास ठाऊक— एकाएकीं नववधूचा तोल गेला. पुढें गेलेल्या मनोहरला मानेभोंवतीं ओढ बसली. उपरण्याच्या गाठीमुळें त्याला आपली पत्नी पुन्हा बरोबर येईपर्यंत कांहीं काळ तेथेंच उभें राहणें भाग पडलें.

जनार्दननें ती गोष्ट हसण्यावरी घालवली— "अरे,—आमची लाज धर. इतक्यांतच—"

आणखी थोडासा रंग पालटला असता पण जनार्दनला आठवण झाली. मनोहरच्या मोटारींत सापटी सापडेल तेथें कोंबलेलीं भारताचीं पिलें अजून तशींच होतीं, न जाणो रात्रभर मोटारच्या तबेल्यांत चिमणेजीव निजून राहायचे.

प्रत्येकानें देवाचें नांव घेऊन जांभया देण्यास सुरुवात केली, तरी वधू नांव घेईना. एकदांचें मुखांतून मोती गळाले,—" स्वदेशी, स्वदेशी जिकडे तिकडे हाहाःकार अन् मनोहरपंतांच्या नांवाचा करतें जयजयकार."

" हूं. उठ उठ भारता —" जनार्दन मनोहरला डिवचून म्हणाला.

" किशोरी—" म्हणून मनोहरनें म्हटलें.

* * *

'बायकोकरतां' म्हणून लोक इंग्लंडहून परत येतात. स्वार्थत्याग हा !

मनोहरला या जन्मीं तरी इंग्लंड फक्त नकाशांत दिसणार होतें. त्यानें आपल्या कुवतीप्रमाणें बायकोकरतां स्वार्थत्याग केला. बी. ए.मध्यें तो पहिल्या खेपेस नापास झाला.

दोघेंहि सुशिक्षित; आणि दोघेंहि विनोदप्रिय ! संसार कसा—

पण पाहूंच आपण त्यांचा संसार.

बळवंतरावांनीं जनार्दनला वकिलीच्या अभ्यासाकरतां एक निराळी खोली रिकामी करून दिली. आणि अडगळीची का होईना जागा मिळाली, नाहीं तर गॅलरींतच पडावें लागलें असतें असा पोक्त विचार करून जनार्दन यापुढें मनोहरच्या खोलींतून कायमचा बाहेर पडला.

मावशीच्या मनाप्रमाणें झालें. सून (मावस का होईना) घरांत आली. आतां एकदां जनार्दन—

दिवसभर मावशी म्हणा, जनार्दन म्हणा किंवा कोणी न कोणी तरी आसपास असणारच. तुमची पुष्कळ इच्छा आहे. पण तुम्हांला बोलायला संधि मिळावी एवढ्याकरतां घरांतलीं माणसें कांहीं बाहेर काढून लावतां येत नाहींत. पुष्कळ वेळां अशी फसगत होई. घरांत कुणी नाहीं अशी खात्री करून मनोहर चारदोन शब्द किशोरीशीं बोलूं लागे. इतक्यांत जनार्दन कांहीं तरी तोंडांत कोंबीत सैंपाकघरांतून बाहेर येई. जनार्दन, तसें पाहायला गेलें तर कांहींच बोलत नसे. उलट त्यानें एके दिवशीं वहिनीला त्याप्रमाणें सांगितलेंसुद्धां,—"वहिनी, तुम्ही

मला देत आलांत इतका सन्मान पुरे झाला. त्या दिवशीं मी खिडकींत आलों असतां तुम्ही खिडकी लावून जो सन्मान दाखवलांत तो मला कळला. आतां तुम्ही मला एर्वीतेवीं अडगळ म्हणून अडगळीच्या खोलींत जागा दिलीच आहे. मी इतर खोलींत वावरूं लागलों, कीं मला अस्तित्व नाहीं. अन् वहिनी किंवा ए बने, तुझ्या बारशाचे लाडू खायला मी आलों होतों." पण सौ. किशोरीबाई कुळकर्णी ( जोशी ) हसण्यापलीकडे कांहींच करीत नसत.

पण एकदां मनोहरनें संधि साधली.

किशोरीबाई ओटीवर होत्या. ( घरांतलीं माणसें हवा खायला गेलीं होतीं.)

असले प्रकार वारंवार घडतात. एखादी गोष्ट स्वाभाविक रीत्या घडून यावी ही आपली कल्पना. पण तीच गोष्ट अस्वाभाविक रीत्या—नव्हे कल्पनेशीं पूर्णपणें विसंगत अशी घडून आली तर—तर ?—

तर माणूस थबकतें, गोंधळतें, कावऱ्या मुद्रेनें इकडे तिकडे पाहूं लागतें. अन् हलकेंच 'इश्श' म्हणून पुटपुटत पायाच्या अंगठ्यानें ओटीवरची जमीन नांगरूं लागतें.

आतां कल्पना करा. आपण कुंकू लावायला गेलों. ( पुरुषवर्गाला उद्देशून हें वाक्य नाहीं. ) आरशांत पाहून कुंकू लावणार. प्रथम ओलें कुंकू लावलें. शेजारच्या टेबलांत घाईघाईनें डबी सारून ठेवली. आतां पिंजर लावायची. पुन्हा आरसा पाहिजेच. अन्—नीट लक्ष द्या—आतां आरशांत काय दिसणार ?

स्वतःचें तें फेंदरें नाक,—पायरीच्या अंब्याप्रमाणें दिसणारी हनुवटी, पतंगाच्या मांज्याप्रमाणें स्वैरगतीनें आंदोलन पावणाऱ्या झिपऱ्या—इत्यादि गोष्टी स्वाभाविकपणें दिसणार—

पण नाहीं ना ! त्याऐवजीं दुसरेंच कांहीं दिसतें. सुपासारखे कान, डोक्याला टोपी—बुचा बुचा गळा—अन् मग आपल्याला समजतें कीं— कीं काय हें माणसाला फसवणें ?

किशोरीची अगदीं हीच अवस्था झाली.

मनोहरची मूर्ति दृष्टीस पडतांच—थबकली !—खात्री ! गोंधळली ? निःसंशयः ! 'इश्श' म्हणून म्हणाली ?—तें काय सांगायलाच पाहिजे ? आणि मग मनोहर पुढें झाला. ( आतां माघार ? )

"किशोरी, चार फूट तीन इंच उंचीचा मनुष्यप्राणी ( कादंबरीकारांचं तें भाषण!) एखाद्या जगड्व्याळ दशमुखी रावणाप्रमाणें भासवणारे आरसे जगांत आहेत. त्याच्या उलट रावणाला एखाद्या अंगठा चोखणाऱ्या रांगत्या बाळा-इतकीसुद्धां उंची न देणारे अनुदार वृत्तीचे आरसे आहेत. ( अजून भाषण पुढें चालूं–) एखादा विद्रूप चेहरा मोहरेदार दाखविणाऱ्या काचा आहेत; आणि एखाद्या लुंग्यासुंग्या कवीला चौदा ओळींचें खाद्य पुरवणारा चेहरा, देवीच्या भेटीनंतर प्रसादाचिन्ह म्हणून ठोक्यांचं भांड करून सोडणाऱ्या काचा आहेत. पण चंद्र म्हणून पाहायला जावं अन्—" कादंबरीकार थांबले.

" अन्—अन् सूर्य दिसावा—" किशोरी काय हटते बोलायला ?

" वाः ! मी तुला चंद्र म्हणणार अन् तूं मला सूर्य म्हणणार. पण--" मनोहर म्हणाला.

आणि सौ. किशोरीबाईंना आतां आठवलें, कीं यजमानराज अजून कोट घालूनच उभे आहेत.

" हें काय, असंच किती वेळ उभं राहणार ? कपडे नाहीं का काढायचे ?"

" आज माझा हात दुखतो आहे--" मनोहर दंड चोळीत म्हणाला.

" आज कोणता हात दुखतो आहे ? काल डावा अन् आज उजवा. घरांत बायका आल्या, कीं तुम्हां पुरुषांचे दोन्ही हात बरे लुळे होतात." किशोरीबाई आतां इतकी धीट झाली होती.

" त्याचं असं आहे—" मनोहरनें सुरुवात केली.

" कसं आहे ? " त्याला किंचित् वेडावून दाखवीत किशोरी म्हणाली.

" हें पहा, तूं मला असं बोलतांना अडवीत जाऊं नकोस." मनोहर म्हणाला.

" त्याचं कसं आहे तें नाहीं सांगितलं ? "

" हो. त्याचं असं आहे कीं, स्वतःचे दोन्ही हात पुढं मागं लुळे पडतील अन् मग कपडे घालूनच जेवण्याची पाळी येईल, या धास्तीमुळं तर आमचा पुरुषवर्ग आणखी दोन हातांची मागणी करीत असतो. मुंग्या नाहीं पावसाळ्या-ची आगाऊ तरतूद करून ठेवीत ? त्याप्रमाणं पुढं येणाऱ्या आपत्तीला

तोंड म्हणून आम्ही पुरुष तुम्हां बायकांना जिंकून आणीत असतों." मनोहर म्हणाला.

" जिं ऽ ऽ कून—" किशोरीमाऊली पंचमांत पट्टी धरून म्हणाली.

" कां ? त्यांत काय पाप आहे ? आम्हां लेखक लोकांची ती एक ठराविक Theory आहे. पुरुष हा जेता आणि स्त्री ही जित हें आम्ही कधींच विसरत नाहीं—मनोहर म्हणाला.

" मग आतां कोणती थिअरी अंगांतला कोट काढायला येतें तें पाहतें" ना—" किशोरी म्हणाली.

आणि याच वेळीं जनार्दन पुढें झाला.

" पाहा ना ! वहिनी, तुम्ही नुसत्या पाहतच राहा. जनार्दनची थिअरी जोंपर्यंत जिवंत आहे तोंपर्यंत तुम्ही नाहीं मनोहरचा कोट काढलांत तरी मी तयार आहे. मनोहरा,— दोन्ही हात लुळे पडलेल्या पोरा,—ये असा पुढं. सबंध जगाला धडा देऊं, कीं बायको फिरली म्हणून मावसभाऊ कांहीं फिरत नाहीं—" जनार्दन हसत म्हणाला.

" जन्या, गाढवा ! नवराबायकोचे संवाद असं अडून ऐकणं पाप आहे. मध्यम पांडवाला याकरतां एक वर्ष संन्यास घ्यावा लागला आहे—" मनोहर कोपाविर्भावानें म्हणाला.

" वाः ! सुरेख ! पण मग आपले संवाद लोकांनीं ऐकावेत म्हणून मुद्दाम लोकांना ऐकूं जाण्याइतकें हळू बोलणारीं जोडपीं मुळींच अपराधी नाहींत ! अर्जुनाप्रमाणं कित्ता गिरवायचा मनांत आणलं तर सबंध जग उद्यां संन्यासी बनेल." जनार्दन म्हणाला.

" अन् मग एखादी सुभद्राहि पण मिळेल—" किशोरी लाजून म्हणाली.

" वाः ! वहिनी, तुला वाचा फुटली ? अग काय हा धीटपणा ? छेः ! छेः ! उंबऱ्याच्या आडून बोल. अन् वहिनी, सुभद्रेच्या गोष्टी पाहिजेत कशाला ? अजून मीं खिडकीआड बसून उसासे सोडायला सुरुवात केली नाहीं." जनार्दन म्हणाला.

" जनार्दन,—तुला आजपासून मी मुळींच भिणार नाहीं. हें बघ, तुझ्या-

देखत मी हिच्याशीं बोलतों—" म्हणून म्हणत मनोहरनें ऐटींत दोन कप चहा करायला 'हिला' सांगितलें.

जनार्दननें कानांत बोटें घातलीं—

*　　　*　　　*

पण ही गोडी फार दिवस टिकत नाहीं. नवराबायको दोघेंहि सुशिक्षित असली, कीं शिकण्यासारख्या सगळ्याच गोष्टी त्यांना शिकायच्या असतात. आणि दोघेंहि विनोदप्रिय ! गोष्टी कोणत्या थराला पोंहोचतील याचा नेम सांगतां येत नाहीं.

चिडलेल्या मनःस्थितींत मनोहर असतां असा एखादा लहानसा खटका उडे.

एके दिवशीं वहीचीं पानें फाडण्याकरतां मनोहरनें हातानें दोरी तोडण्यास सुरुवात केली. दोरी तुटेना. हाताला करकोचा पडला. किशोरी उभी राहून पाहत होती. शेवटीं वहीवर संतापून मनोहरनें एक ( अप ) शब्द उच्चारला. आणि चाकू मागितला. चाकू कांहीं सापडला नाहीं. मनोहर स्वतः उठला. पुस्तकाच्या कपाटांत चाकू सापडेना. सारीं पुस्तकें कोपऱ्यांत भिरकावलीं गेलीं. होतां होतां खोलींत एकच गोंधळ झाला—

"आज चाकू मागावा तर आमच्या सरणाला दोरी तोडायला तो मिळावा—" मनोहर संतापून म्हणाला. किशोरीच्या डोळ्यांत पाणी आलें. मनोहर जास्तच चिडला.

"कां ? रडायला का तुझा नवरा मेला आहे ? चांगला जिवंत आहे. तो मेल्यावर मग पोटभर रड— " मनोहर म्हणाला. किशोरीनें कांहीं एक न बोलतां अंथरूण गाठलें. अन् मग मनोहरला पश्चात्ताप झाला. अन्—मग त्यानें तिची समजूत घातली.

निष्कारण माजलेलीं रणें तहनाम्याच्या शर्तीबरहुकूम बंद पडल्यानंतर जी एक प्रेमाची सात्त्विक लाट उसळते त्या लाटेंत पोहण्याची गंमत कांहीं और असते. आणि ती लाट पुन्हा उसळावी याकरतां पूर्वीच्या तहनाम्यांत नवीन युद्धाचीं बीजें पेरण्याचें मनोहरचें कौशल्य अपूर्व होतें.

कोणत्याहि युद्धाला कारणें असावींच लागतात असें कांहीं नाहीं. किंबहुना

कुठें करमेनासें झालें, कीं करमणूक म्हणून युद्धें पुकारण्यांत येतात हें आतां सर्वांना कळून चुकलें आहे. आणि तें युद्ध संपल्यानंतर कांहीं तरी ओढाताण करून एखादी कारणपरंपरा उभी करावी लागते.

मनुष्यस्वभावच आहे हा. उभ्या आयुष्यांत एकदांसुद्धां बायकोशीं भांडण नाहीं असा सत्पुरुष कोणाहि माउलीच्या वांट्याला आलेला नाहीं. आणि बायकांनाहि त्यांत मौजच वाटतें. सातआठजणी जमल्या, कीं कुणाचा नवरा किती रागीट हें अजमावून पाहण्याची त्यांची तऱ्हा आज कांहीं नव्यानें सांगायला नको.

मुद्दा हा, कीं मनोहर आम्हा पुरुषवर्गाला अपवाद नव्हता.

आणि त्याला दुसरी एक काळजी होती, त्यामुळें तो जास्तच चिडला.

'ठाणा लोकल' झाल्यानंतर त्यानें एकहि पान लिहिलें नव्हतें ही गोष्ट त्याला बोचूं लागली. त्याचें ध्येय काय होतें ? चार वर्षांपूर्वी त्याचा स्टेशनवर अपमान झाला होता. त्या अपमानाची भरपाई म्हणून तो 'दळणवळणा'वर एक कायसेंसें लिहिणार होता. पुन्हा त्या फेलोची जिरवायची होती हें त्याचें ध्येय. अन् कुठें आहे तें ध्येय ?

'भूत' पत्राच्या बातमीदाराला त्यानें चापून सांगितलें होतें, कीं 'ठाणा लोकल'नंतर आणखी एखादी 'कुर्ला लोकल' निघण्याच्या बेतांत आहे. कुठें आहे ती 'कुर्ला लोकल ?'

आणि आतां बायकोशीं भांडत बसेल का भांडल्याबद्दल तिची माफी मागत बसेल, का युनिव्हर्सिटीच्या परीक्षेला बसेल, का आणखी एखादी 'कुर्ला लोकल' काढील ? एकटा जीव हे सगळे डाव एकदम कसे खेळेल ?

मनोहरनें अगदीं निश्चय करून पाहिला. आतां एक वर्षभर बायको नाहीं— कांहीं नाहीं. आतां अभ्यास कीं लेखन. बायकोला देऊं तिच्या बापाच्या घरीं धाडून—

पण बायका बापाच्या घरीं धाडून देण्याकरतां कांहीं तुमच्या घरीं येत नसतात.

त्यानें प्रयत्न करून पाहिले. बायकोला माहेरीं धाडून दिली; पण माहेर

समोरच. रोज पुन्हा समोरची खिडकी उघडूं लागली. तो प्रयत्न निष्फळ झाला. पुन्हा किशोरी सासरीं आली.

मनाची एकाग्रता होण्यासाठीं मनोहरनें बऱ्याच खटपटी केल्या. आठ आणे, बारा आणे या दरांत मिळणारीं थोरपुरुषांचीं इंग्रजी चरित्रें त्यानें वाचलीं. पण छेः!

फुगा फुटला. आतां तो कसा फुगेल? आणि हें मनोहरला आतां पूर्णपणें कळून चुकलें, कीं आपल्या फुग्याच्या चिंधड्या झाल्या आहेत. आशा मोठी वेडी म्हणून म्हणतात.

फुटलेला फुगा पुनः न जाणो कदाचित् फुगेलहि, या कल्पनेनें लहान पोर पुन्हा ती पिंगाणी तोंडांत घालतें. त्याप्रमाणें मनोहरनें एके दिवशीं कागदाचा भारा पुढें घेतला—

आणि एक पानहि लिहून झालें नाहीं.

एकीकडे, आसपास कोणीहि नसतांना, 'ठाणा लोकल'ची गाडी तासीं ३-४ पानें या वेगानें हाकणारा मनोहर आतां तासाला पंधरा-वीस कागद फाडण्यापलीकडे कांहींच करीना.

आणि किशोरीला जें हसूं लोटलें—

दुसऱ्या दिवशीं ती. वडिलांचें चि. बाळास पत्र आलें—

"येथें कलेक्टर कचेरींत ५० रु.ची जागा आहे. पाहा, दिवसेंदिवस ब्राह्मणास नोकरी मिळणें कठीण झालें आहे. पैसा भेटणें मुष्कील आहे. आज ५० घेतलेत तर उद्यां ५०० होण्याचा संभव आहे. सरकारी नोकरी न करण्याचा विचार असेल तर आपण यापुढें काय करणार आहांत याचा सविस्तर खुलासा व्हावा—"

मनोहर क्षणमात्र डोळे मिटून पडला. कुणाचा सल्ला घ्यावा? बायकोचा—

मनोहरचें स्त्रीदाक्षिण्य या युगास साजण्यासारखें होतें,—पण या बाबतींत त्याला किशोरीचा सल्ला घ्यावेंसें वाटेना. काय करावें?—

* * *

दोन-चार दिवसांनीं मनोहर सहकुटुंब सोलापुरीं जाण्यास निघाला.

मावशीनें खणानारळानें सूनबाईची ओटी भरली आणि 'लवकर मुलगा होऊं द्या ' असा प्रेमानें आशीर्वाद दिला.

" होईल बरं. उद्यां तुझ्या घरीं तो शिकायला येईल बरं ! " जनार्दन म्हणाला.

बळवंतरावांनीं मनोहरला समयास साजेसा उपदेश केला, " छान ! मी हिला नेहमीं सांगत होतों कीं, मनोहर is a good chap. अरे, काय करायचं आहे बी. ए. होऊन ? हें तुला पटलं. अन्—पण जपून वाग हं. ऑफिसला एक मिनिट उशीर झाला नाहीं पाहिजे. त्याकरतां संध्या राहिली तरी चालेल—बाकी, तुम्हां नवीन पोरांना संध्येची फारशी अडचण पडतच नाहीं म्हणा.—"

स्टेशनपर्यंत जनार्दन आला होता.

मनोहर स्टेशनपर्यंत कांहीं एक बोलला नाहीं.

आणि स्टेशनवर तो भरमसाट बोलूं लागला.

" अन्,—बरोबर चार वर्षांपूर्वी मी या पुण्यांत पाऊल टाकलें होतें. याच फलाटावर मीं पुण्यास नमस्कार घातला होता. याच ठिकाणीं एक तिकिट-कलेक्टर माझ्या पाठीमागं हात धुऊन लागला होता. जनार्दन, फुगा फुटला. पिंगाणी मात्र कायम आहे—" मनोहर म्हणाला.

जनार्दननें कांहींच उत्तर केलें नाहीं. मनोहर बोलूं लागला—

" त्या दिवशीं मी अशीच एक पिंगाणी होतों. पुढं फुग्यांत वाराच शिरला- अन् फुगा फुटला. फुग्यांत वाराच शिरला नसता तर ?—कुसळहि नसतं शिरलं—"

" मनोहर, किशोरीला कुसळ म्हणूं नकोस." जनार्दन गंभीरपणानें म्हणाला.

" नाहीं. ती कुसळ असेल किंवा नसेल, मला खात्री देतां येत नाहीं. पण ती घरांत आल्यापासून माझं चित्त उडालं. आणि मी आपलं ध्येय विसरलों. पण थांब,—माझं ध्येय तरी तेंच होतं का ? मग माझं ध्येय तरी कोणतं ? कोणताहि चांगला विचार डोक्यांत आला, कीं तोच ध्येय म्हणून आपण काय करतों ? माझीच चूक. मी भलत्याच गोष्टीला ध्येय म्हणून समजलों. त्याचा हा परिणाम—जनू, तुझं ध्येय काय आहे ?" मनोहरनें प्रश्न केला.

" माझं? आमच्या वडिलांना माहिती आहे तें. दोन वेळां जेवण, दोन वेळेला चहा, अन् आईबापांची दृष्टि चुकवून सिनेमा!—" जनार्दन हसून म्हणाला.

" नाहीं. तें तुझं ध्येय नाहीं. तूं माझ्यासारखा घायकुत्या नाहींस. तूं अवसान पाहून ध्येय ठरविणारा आहेस. मला सांगायचं आहे तें एवढंच, कीं कोणतंहि ध्येय तूं ठरव— पण लेखन हें ध्येय ठरवूं नकोस ! जगामधें उन्माद-कारक समजल्या जाणाऱ्या गोष्टींमधें लेखन हा पहिल्या प्रतीचा उन्मादकारक धंदा आहे. त्यानं डोकं बिघडतं. आपल्याविषयीं आपण भलतीच कल्पना करून बसतों. आणि जगांत—खरं पाहायला गेलं तर,—आपली कवडीइतकीसुद्धां किंमत नाहीं. वरकरणी चार लोक 'वाहवा' म्हणतात, पण मनांत 'गाढव' म्हणून संबोधतात. चार टवाळ लोकांमधें लेखक हा पहिल्या प्रतीचा टवाळ ठरतो." मनोहर म्हणाला.

" पण हें विधान सर्वांनाच लागू नाहीं—" जनार्दन म्हणाला.

" आपण अल्पसंख्याकांना जमेस धरीतच नसतों. बहुतेक लेखकांचं आयुष्य मी सांगतों तसं चाललं आहे.–पण हें विंजन आलं. गाडी निघेलच बहुतेक–"

" भाउजी येते हं ऽ—" किशोरी डबडबलेल्या नेत्रांनीं जनार्दनकडे पाहत म्हणाली.

" वहिनी,—ये हं ऽऽ––पहिल्या खेपेला तुला पुणंच पाहावं लागणार!" जनार्दन हसून म्हणाला.

गाडी स्टेशनबाहेर पडली.

" भाउजी काय म्हणत होते?" किशोरीनें विचारलें.

" भाउजी कांहींच म्हणत नव्हते. मीच भाउजींना कांहीं तरी म्हणत होतों." मनोहर म्हणाला.

" खिशांत काय आहे तें? वाचायला पुस्तक विकत घेतलं?"

" विकत नाहीं. आपण लिहिलेल्या पुस्तकाला आपण पैसा देत नसतों तरी किंमत मात्र द्यावीशी वाटते. कारण त्यांत आपली किंमत साठवलेली असते.– आपली 'ठाणा लोकल' आहे पाहिजे तुला?—"

---

# हक्कांची जाणीव : : ६

संकटाची सूचना मिळतांच परमेश्वरी सत्तेची जाणीव होऊं लागते. दुनिया आबादीआबाद असली म्हणजे परमेश्वराच्या काकाचें आपण कांहीं एक देणें लागत नसतों. सुखाच्या आणि दुःखाच्या मध्यमरेषेवर असतांना परमेश्वर कधीं असतो, कधीं नसतो, असा थोडासा पावसाळयांतील इंद्रधनुष्यासारखा चमत्कृतिपूर्ण प्रकार दृष्टीस पडतो.

विनू बी.ए.च्या वर्गांत होता तोंपर्यंत तो परमेश्वराचा कट्टा वैरी होता. महिना पन्नास रुपयांची मनि ऑर्डर जोंपर्यंत वेळचे वेळीं येत असे तोंपर्यंत विनू परमेश्वराची कवडी देणें लागत नसे. आस्तिकनास्तिक वाद मोठा कठीण आहे. तो कुणालाहि सोडवतां आलेला नाहीं. आणि विनूला तर तो मुळींच सोडवतां आला नाहीं. एवढा मोठा नास्तिक पक्षाचा विनू, पण मंजिरीशीं ओळख झाल्याबरोबर दुसऱ्या दिवशीं चिठ्या टाकून पाहूं लागला, कीं जमेल कीं नाहीं हिचें आपलें लग्नाचें ! चिठीमध्यें कधीं 'होय' येई, कधीं 'नाहीं' येई ! रावसाहेब घोड्यावरून पडले तरी 'पडले' म्हणणें जोखमीचें काम असतें. अर्थ तोच, पण शब्दयोजना जरा निराळी करावी लागते. विनू 'हरलों' म्हणून कधींच कबूल करीत नव्हता.

'काय नेम बुवा ?—' 'असेलहि–' 'आणि मी म्हणतों असला म्हणून आपलें काय त्याच्यांत वांकडें होणार आहे ! —' अशा तऱ्हेचीं परमेश्वराशीं

समेटाचीं बोलणीं सुरू झालीं. थोडक्यांत सांगायचें म्हणजे विनू आपल्या सनातनी धर्माला मिळूं पाहत होता.

मंजिरीनें घरांत येऊन स्वातंत्र्याचें निशाण फडकावलें त्या वेळीं मात्र विनू परमेश्वराचा सल्ला घ्यायला धावला. कलियुगीं परमेश्वरानें मूकव्रत धारण केल्याचा जाहीरनामा काढलेला असल्यामुळें विनूला धीर देऊन चार उपदेशाच्या गोष्टी सांगायला त्याला बनणें शक्यच नव्हतें. विनूची आतां मात्र मोठी विलक्षण स्थिति झाली होती. मोठ्या विश्वासानें व आर्तस्वरानें परमेश्वराला त्यानें हाक मारली, पण हाकेला प्रत्युत्तर मिळण्याची कांहींच आशा नव्हती. आतां मात्र विनूला परमेश्वराचें अस्तित्व बिनतक्रार मान्य झालें होतें. संकटांतून वाट काढावी कशी ?

हातांत एक पुस्तक घेऊन विनू ईझीचेअरवर पडला होता. त्याचे डोळे पुस्तकाकडे होते तरी पुस्तकांतच होते असें म्हणतां येणार नाहीं. पुस्तकाच्या पानागणिक गतआयुष्याचीं पानें तो चाळीत होता, त्यांत त्याचे डोळे गुंतले होते. एखादी गोष्ट दृष्टीसमोर असते पण दृष्टीला त्या गोष्टीची जाणीव नसते.

विनूनें आपल्या आयुष्यांतील एक विवक्षित पान उघडलें.

* * *

तास नव्हता म्हणून विनू वर्गाच्या बाहेरच उभा होता. पुढच्या तासाला रामराम ठोकून घरीं जावें आणि एक 'झ्याक्स'पैकीं ताणून द्यावी. या गोडशा विचारांत विनूचा मेंदू भ्रमण करीत होता; इतक्यांत त्याच्या पाठीवर थाप—थाप कसली—रट्टाच तो ! बसली. विनूनें पाठ चोळीत मागें वळून पाहिलें.

“ काय बर्वे, काल प्रभातला उदार आश्रय दिलेला दिसतोय् ? ” विनूचा मित्र पुस्तकावर पुस्तकें घाशीत म्हणाला.

“ नाहीं रे ! कंटाळा आला आहे—तासभर थांबावं—तर तो रड्या 'नको जीव'सं करून सोडणार —, त्यापेक्षां—” विनू म्हणाला.

“ यः पलाय सजीवति—! चल, माझ्या रूमकडे चल—. तासाला बसण्यापेक्षां एक कपभर चहा ठेवून दिला तर पोट तरी भरेल. या तासांना बसून काय पोटं भरणार आहेत—? ” असें म्हणून विनूच्या दोस्तानें त्याला ओढण्यास सुरुवात केली. एरवीं चहाच्या कपाकरतां दोस्ताची रूमच काय पण चीन-

देशसुद्धां विनूला फारच जवळ वाटला असता, पण नशिबाचे लागेबांधे एखादे वेळेस पहा कसे एखाद्याचीं तळी उचलून धरतात ती! विनूचा मित्र एका बाजूनें अमृतपानाचें मिष दाखवून त्याला ओढू पाहत होता आणि विनूचें भवितव्य त्याला कांहींच कारण नसतां तेथेंच खेचून धरीत होतें. विनूनें महत्प्रयासानें आपला हात सोडवून घेतला.

" नको रे! बसतों एक तासभर! कंटाळा आला तर काढूं एक डुकली," म्हणून विनू परत फिरूं लागला.

" अरे पण चहा देतों ना?— चहा म्हटल्यावर मग काय बोलणं आहे?— चायी बोल्या तो बिलकूल ठीक है,—" विनूचा मित्र हिंदी भाषेच्या अवसानांत म्हणाला.

ब्रह्मा आडवा आला तरी ‘ होणारें तें न चुकेल ’ म्हणून म्हणतात तिथें चहा म्हणजे कोण्या झाडाचा पाला!

" आईबापांचे ऋण आहे बाबा बोडक्यावर! पैसे पाठवतात, उपकार करतात आमच्यावर! निदान लाजेकाजेस्तव तरी विद्यार्थिधर्म पाळूं दे. एकदां बी. ए. तून सुटलों म्हणजे गंगेंत घोडे न्हाले!" विनू हसून म्हणाला.

" अरे पण बर्वे, असं वेड्यासारखं काय करतो आहेस?—ऋण फेडण्याकरतां उपाशीं राहावं असं कोणते वडील म्हणतील?— पण मी तर म्हणतों ऋणाचा प्रश्नच येतो कुठं?— नाहीं देत कॉलेजला पैसे तर घरीं खायला घाला म्हणावं. तूं हें ऋणाचं वेड डोक्यांतून काढून टाक. अरे, चार दिवस मौज करायची, हसून-खेळून दिवस घालवायचे.— पुढं आहेच कीं त्रास जन्मभर! ‘अग, अग’ म्हणून रडकुंडीस जीव येईल. चल, देवाच्या दयेनें आहेत सोन्यासारखे दिवस.... अरेच्या! देव धर्म तुझ्या कोशांतच नाहींत, नाहीं का?"—विनूच्या मित्रानें पराकाष्ठा करून पाहिली.

पण विनू जागचा हलला नाहीं. लहान मुलें ज्याप्रमाणें ‘ आतां कुठं जाशील टोळंभट्टा—गुइं गुइं,’ म्हणून एखाद्याच्या पाठीस लागतात त्याप्रमाणें विनूचें दैव त्याला खिजवीत होतें. नाहीं तर इतक्या मुद्देसूद, परिणामकारक तत्त्वज्ञानाचा कांहींच कसा उपयोग झाला नाहीं?

" नाहीं येत तर मर लेका,"—म्हणून पुटपुटत विनूचा मित्र पुस्तकांची चवड छातीशीं धरून चालता झाला.

विनूला क्षणभरच का होईना पण आपण न जाण्यांत कांहीं पुरुषार्थ साधला असें वाटेना. विचारांच्या लहरींसरशीं विनू दोन पावलें पुढें सरकलासुद्धां,— आणि कदाचित् विनू गेलाहि असता. —पण सुशिक्षित समाजाच्या चालीरीती आयत्या वेळीं पुढें झाल्या. सुशिक्षित समाजांत एक असा स्पष्ट निर्बंध आहे, कीं जर करतां एक जिना असेल, आणि जिन्याची रुंदी एका वेळेस चारच माणसांना रहदारीचा परवाना देत असेल व खालून येणाऱ्या चार व्यक्ति एक समयावच्छेदेंकरून सारिका, कोकिला यांच्या आवाजाशीं स्पर्धा करूं पाहणाऱ्या स्त्रिया असतील, तर वरून येणाऱ्या तरुण पुरुषानें खालीं जाण्याचा प्रयत्न न करतां, चार पावलें दूर सरून अदबीनें आकाशांतील निरनिराळ्या प्राण्यांचें कौतुक करीत उभें राहावें. विनूच्या अंगांत या साध्या: सामाजिक नियमांचें उल्लंघन करण्याचें धैर्य बिलकूल नव्हतें.

विनूनें क्षणभरच त्यांचेकडे पाहिलें असेल,—विनू देहभान विसरला. आई-बापांचें ऋण विसरला, चहा विसरला, सर्व कांहीं विसरला,—आणि भ्रमिष्टा-सारखा लाजलज्जा झुगारून देऊन त्या मुलींकडे टक लावून पाहूं लागला.

वेषरचना, केशरचना—चौघींचीहि सारखीच होती. चौघींहि दिसायला—काय, तुलना तरी कशी करणार !—सुरेख होत्या. इतकें सौंदर्य ह्यांना देतें तरी कोण? आणि त्या सौंदर्याचा यांना फायदा काय? आपण सुंदर आहोंत, आपल्याकडे त्याचकरतां चार सभ्य पुरुष निरनिराळ्या भावनेनें पाहतात याची त्यांना जाणीव असेल काय ? —आणि असल्यास त्याबद्दल त्यांना काय वाटतें ? —खेद ? —गर्व ? —अभिमान ? —राग ? —काय वाटतें ?—

हे प्रश्न विनूच्या आटोक्याबाहेरचे होते. जगाच्या व्यवहाराशीं सर्वस्वीं अनभिज्ञ असणाऱ्या कच्च्याबच्च्या पोरानें हे विचार डोक्यांत आणले हेंच पुष्कळ होय.

कोणत्या ना कोणत्या तरी विषयावर वादविवाद करीत चौघीजणी वर येत होत्या. विनू नांवाचा कुणी एक प्राणी वरती उभा राहून आचरटासारखा आ वासून आपल्या सौंदर्याचें निरीक्षण करीत असेल ही कल्पनाच त्यांच्या

डोक्यांत असण्याचें कारण नव्हतें. अर्थात् त्याचे विचार त्यांना कळणें अशक्यच होतें.

विनूनें त्यांच्याकडे पाहण्याचें कार्य तसेंच चालू ठेवलें. मद्रासी चपला आणि त्यासुद्धां काळ्याकुळकुळीत,—सुरेख दिसतात नाहीं ?—शब्दाची कबुली देतां येणें शक्य नसलें तरी पण प्रत्येक तरुणाला आपला स्वतःचा चेहरा थोडाबहुत मोहकच दिसत असतो. पण विनूचा गर्व आज कोठल्या कोठें नाहींसा झाला. पुरुषांना सौंदर्याच्या बाबतींत स्त्रियांशीं कधींहि चढाओढ करतां येणें शक्य नाहीं. विनूनें सहजच आपल्या हाताकडे पाहिलें कोण राकटपणा हा ! तोच त्या मुलीचा हात पहा ! एक—एक चूक काढतां येणार नाहीं. स्वतः कुऱ्हाड घेऊन चार लांकडांची जमवाजमाव करण्याची ताकद त्या हातांत जरी नसली तरी दुसऱ्याच्या हाताला धरून त्याच्याकडून सत्तेनें चार लांकडें फोडून घेण्याची धमक त्या हातांत आहे.

साडेपांच फूट उंचीच्या विनूच्या आकृतीकडे बिलकूल लक्ष न देतां चौघी-जणी थेट प्रोफेसरांच्या कॉमनरूमकडे गेल्या. विनू जागचा हालला नाहीं. त्याला अजून कुणाचीच कदर बाळगण्याचें कारण नव्हतें. चुकलेलें मूल ज्याप्रमाणें आपल्या घरानजीक आलें म्हणजे आसपासच्या लोकांकडे बिलकूल लक्ष न देतां तडक घरांत आईचा शोध काढीत पळत सुटतें त्याप्रमाणें विनूची स्थिति झाली होती. काय असेल तें असो, त्याला कसेंसेंच होऊं लागलें. चार-चार तास धीमेपणानें क्रिकेटच्या पटांगणावर उभे राहून धावांची भर करतांना त्याला जितका शारीरिक त्रास होत असे तितकाच मानसिक त्रास त्याला जाणवूं लागला !

जरा वेळानें मुली परत आल्या. विनूला पाहिल्याबरोबर त्या थबकल्या.

मुलींनीं कांहीं तरी निश्चय केलासें दिसत होतें. ह्या समोरच्या साडेपांच फूट उंचीच्या विचित्र प्राण्याला उद्देशून त्या कांहीं तरी बोलत होत्या. शेवटीं सुरुवात करण्याच्या निश्चयानें एक मुलगी धिटाईनें पुढें सरली—पुन्हा दोन पावलें 'इश्श बाई' करीत परतली. पुन्हा सर्व बळ एकवटून चाचरत म्हणाली,

" प्रोफेसर ऽऽअऽऽऽ—" अवसान सुटतांच ती थांबली.

विनू चकितच झाला. त्याला या स्वर्गसुखाची कल्पनाच नव्हती. तो

अडखळला. काय बोलावें हें त्याला आठवेना. बोलावें तरी पंचाईत—न बोलावें तरी पंचाईत!

"अं ?"—करून विनूनें हातांतल्या पुस्तकांकडे लाजून पाहिलें.

"प्रोफेसर सुरंगी कुठें आहेत ?—" त्या मुलीनें प्रश्न केला.

त्यानें अर्धवट तिच्याकडे, अर्धवट पुस्तकाकडे पाहत (पुन्हा लाजून!) उत्तर केलें—

"मला माहिती नाहीं—"

"केव्हां येतील ?—" सरावानें धिटाई येतें म्हणतात त्याचें हें उदाहरण.

"मला माहिती नाहीं—"

मुलींचा नाइलाज झाला. मोठ्या विश्वासानें या गृहस्थाला माहिती विचारायला पुढें व्हावें तर याचा आपला एक मंत्र—'मला माहिती नाहीं!' —काय बाई तरी!—म्हणे 'मला माहिती नाहीं!'—मग काय जेवायचें माहिती आहे का ?—का तेंहि शिकवावें लागतें ?—

मुली परत गेल्या. विनूला स्वतःच्या वर्तनाची मोठी चीड आली. चांगला वीस-एकवीस वर्षांचा घोडा झाला—पण चार शब्द कांहीं बोलतां येत नाहींत.—म्हणे मला माहिती नाहीं. केव्हां माहिती होणार आतां ?—ईझीचेअरवर पडलेल्या विनूनें पुढचें पान उघडलें.—

* * *

क्रिकेटच्या सामन्यांत बरोबरीचे गडी जेव्हां नुसतीच 'जा-ये' करण्याचे परिश्रम घेतात तेव्हां स्वतः बिलकूल न चाचरतां, नेटानें पन्नास-साठांपर्यंत धावा आपल्या नांवावर चढविणाऱ्या अगर प्रतिपक्षाच्या आणि प्रेक्षक-समुदायाच्या कल्पनेच्या आंत प्रतिपक्षाकडचे गडी बाद करण्याच्या मार्गास लावणाऱ्या व्यक्तीला 'Hero' अशी संज्ञा प्राप्त होत असते. विनू त्या दिवशीं पहिल्या प्रकारानें 'Hero' या महत्पदास चढला होता. पांच गडी आले आणि बॅटी फिरवीत, तोंडानें शीळ घालीत, 'अरे, खरा औट नव्हतों'—म्हणून अंपायरच्या निकालाविषयीं सखेदाश्चर्य प्रकट करीत चालते झाले. क्रिकेटमध्यें खेळणारा गडी स्वतः कधींच औट नसतो. अंपायरलाच अक्कल नसते—उगीचच हातवारे करतो. त्यापेक्षां हात तुटलेलाच अंपायर असला तर

काय बहार होईल! पांच गडी गेले तेव्हां धावा पंचवीसांपर्यंतच धावल्या होत्या, आणि चांगले चांगले हात खपले होते. विनूच्या कॉलेजांतील मुलांचे चेहरे पार उतरून गेले होते. 'आतां काय? —काय होणार तें दिसतेंच आहे! विकेट्सनीं नाहीं मिळाला म्हणजे जिंकली,' वगैरे वगैरे ठराविक सांच्याची बोली सुरू झाली होती. विरोधी कॉलेजांतील लोकांनीं झांजा फोडून टाकण्याचाच घाट घातला होता. दोन्ही पक्षांतील लोकांनीं 'म्हसोबा' स्थापन करून त्या त्या प्रसंगानुसार त्याची पूजा आरंभली होती. पण विनू हातांत बॅट घेऊन रणांगणावर उभा होता.

चेंडू फेकणारानें आपल्याकडून होईल तितका प्रयत्न करून पाहिला. 'लेग'-वर चेंडू टाकून पाहिला,—'ऑफ्' ला चेंडू दिला,—नाना तऱ्हा करून विनूला परत जाण्याचा सल्ला दिला,—पण विनू लौकर जाण्याचीं चिन्हें दिसेनात. 'लगाव फटका' म्हणून प्रेक्षकसमुदायांतून आरोळी येण्याचा अवकाश, कीं सहानुभूति दाखविण्याकरतां म्हणूनच कीं काय, चेंडू धडपडत त्यांना भेटायला जाऊं लागला. क्रिकेटचा खेळ अतिशय भावनोद्दीपक आहे. विनूच्या खेळासंबंधीं जो तो समाधान व्यक्त करूं लागला. विनूच्या पन्नासांची जाहिरात लागतांक्षणींच विनू सर्वांच्या प्रेमाचें स्थान होऊन बसला. 'खेळून राहिला आहे जवान!' अशा तऱ्हेच्या हृदयावर आनंदोर्मि उसळविणाऱ्या लाटा आदळूं लागल्या. विनूची बॅट बिनदिक्कत समोरून येणाऱ्या चेंडूला झोडपून काढण्यांत चूर होती.

चलतीच्या काळांत मनुष्याला फाजील अवसान प्राप्त होतें आणि तें अवसान त्याच्या नाशाचा पाया बसवतें. महत्पदावर चढलेल्या लोकांच्याविषयीं ही एक भीति वाटत असते, कीं मोठेपणा कायम राखण्याचें बळ यांच्या अंगांत असेल कीं नाहीं कुणास ठाऊक! कांहीं एका ठराविक मर्यादेपर्यंत विनू खरोखरीच प्रभावशाली होता. जोंपर्यंत तो मोठेपणाला बिचकून असे तोंपर्यंत मोठेपणा त्याच्या न कळतच त्याला चिकटून असे. पंचाहत्तर धावा झाल्या रे झाल्या आणि विनूला डौल चढला. सर्व कांहीं तुच्छ वाटूं लागलें. इतका लोकांचा जमाव आपल्या भजनीं लागलेला–त्याचें डोकें बिथरलें. पुढचाच चेंडू अलदपणें एकाच्या हातांत ठेवून विनू परत फिरला!

मोठ्या माणसाचें डोकें फिरलें म्हणून लाथा मारण्यास तयार व्हावें इतका नादानपणा मनुष्यमात्रामध्यें नाहीं. उलटपक्षीं त्याच्या गतवैभवाविषयीं उदार-पणाचेच उद्गार बाहेर पडतात. एक वेळ अनुकंपा वाटेल पण तिरस्कार— नांव नको! विनूनें शंभर धावा काढल्या तरी पाहिजेच होत्या,—प्रत्येक जण त्याच्या शंभराची अपेक्षा करीत होता. तरी पण पंचाहत्तर हा कांहीं लहानसहान आंकडा नव्हे, या युक्तिवादामुळें विनूचें मोठें स्वागत करण्यांत आलें. विनूनें आपली फेल्ट हॅट किंचित् वर उचलून स्वागताचा स्वीकार केला.

विनूचें आणखी कोणी स्वागत केलें? विनूलाच माहीत. मंजिरीनें रुमाल उडवून अर्धवट हसत, भावनेचा जोर अधिक असल्यामुळें अर्धवट दबकत, 'Well played, Brave' म्हणून जेव्हां म्हटलें त्या वेळेस विनूला काय वाटलें असेल याची कल्पना त्याच्यासारख्याच कॉलेज Hero ला पूर्णपणें येईल—इतरांनीं दुरूनच तर्क करणें उत्तम!

विनूच्या कॉलेजनें शेवटीं हार खाल्लीच. व्हायचें होतें तें झालेंच! पण विनूचा 'भाव वाढला.' इतर लोक शंभरांपर्यंत धावा काढीत असतांना आपण दोनशें जरी काढल्या तरी त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. —तसेंच आपल्या धावांनीं जय मिळविणें हेंहि तितकेंसें फलदायक नाहीं. 'जरा आमचा बर्वे थोडासा आणखीन टिकला असता तर रेऽऽ—' या खेदप्रदर्शक वाक्याची मौज कांहीं औरच आहे!

मॅच सपल्यावर संध्याकाळीं विनू मुद्दामच चार सोबत्यांबरोबर पायीं चालला होता. विनूचें गुणवर्णन पुष्कळच चाललें होतें. कांहींजण विनूच्या जमिनीसरपट फटक्याविषयीं कौतुक करीत होते, तर कांहींजण त्याच्या Straight Bat चें कौतुक करीत होते. विनू मात्र सारखा पुढें पाहत होता.

विनूची आराध्यदेवता पुढच्याच स्त्रियांमध्यें होती. विनू कान देऊन ऐकत होता.

"बायकांना क्रिकेट खेळायला दिलं तर मीहि बर्व्यासारखंच खेळेन—" मंजिरी आपल्या मैत्रिणींना पटवून देत होती. विनायक मनाशींच हसला.

* * *

बी. ए. चे पेपर्स नुकतेच परीक्षकांच्यापुढें 'घ्या एकदांचे' म्हणून आपटून विनू घरीं जाण्याच्या विचारांत होता. विचारांत होता म्हणण्यापेक्षां विचार करण्याचा प्रयत्न करीत होता म्हणणें जास्त सयुक्तिक होईल. खरें सांगावयाचें म्हणजे विनू आपल्या जन्मदात्याशीं बेइमान झाला होता. ज्यानें जन्म दिला त्याच्या ऋणाची अणुरेणु फेड म्हणून मुलानें कृतज्ञताबुद्धि बाळगावी, निदान सुट्टींत घरीं जाऊन 'आहोंत–जिवंत आहोंत आम्ही' म्हणून त्यांची खात्री पटवून द्यावी, हा शिष्टसंमत मार्ग आहे. पण विनू दुसऱ्याच लफड्यांत हात गुंतवून बसला होता. मंजिरीनें त्याला वेड लावण्याचेंच काय तें बाकी ठेवलें होतें.

तसें पाहायला गेलें तर कांहींसुद्धां नव्हतें. कुठें उगीच दोनदां चारदां स्मितहास्य!—यापलीकडे कांहींसुद्धां नाहीं. पण म्हणतात ना– कीं वाऱ्याकरतां प्राण कासावीस करणाऱ्या जिवाला कुठें उगीच एखादें पान हाललें तरी स्वर्गसुखाची आठवण होते. पोरगी तीनदां,—नाहीं नाहीं—चारदां मागें पाहून हसली,—विनूसुद्धां थोडेंसें हसला. अगदीं थेट तिच्यासारखें हसला.

विनूचा घरीं जाण्याचा बेत कायम होण्यास तसेंच कांहीं प्रबल कारण होतें. चार दिवस फेऱ्या घातल्या, पण मंजिरीची खिडकी लावलेली! पहिल्या दिवशीं विनूला थोडेंसें चुकल्या-चुकल्यासारखें झालें; दुसऱ्या दिवशीं आश्चर्य वाटलें; तिसऱ्या दिवशीं विनू संतापला. चवथ्या दिवशीं संध्याकाळीं विनूनें घरांत आपल्या थोरल्या बहिणीला आपला सोलापूरला जाण्याचा निश्चय कळवला. त्याच्या थोरल्या बहिणीला त्यांत कांहींच वाटलें नाहीं. तिनें त्याच्या सामानाची बांधाबांध सुरू केली.

विनूनें आपल्या मेहुण्यांना आपला बेत कळवला—

"नाना, उद्यां Madras Fast नें मी सोलापूरला जातों."

"अरे, पण सोलापूरला उन्हाळ्यांत जाऊन तूं काय करणार?–त्याच्यापेक्षां असं कर, काकांना पत्र लिहून मे महिन्यांत त्यांनाच इकडे बोलाव. काय ग, मी म्हणतों तसंच करायला पाहिजे कीं नको?—" विनूचे मेहुणे आपल्या अर्धांगीकडे पाहत म्हणाले, अर्थात् थोड्याबहुत प्रमाणानें होस

हो देणारी अर्धांगी यावर काय उत्तर देणार? तरी पण विनूला आतां सोलापुरला जाण्याची जास्तच आतुरता वाटूं लागली.

आनंदातिशयानें बेभान झालेल्या मनुष्याला आवरून धरणें जरी तितकेंसें सोपें काम नसलें, तरी पण निराशेनें बेभान झालेल्या माणसापेक्षां तें सोपें आहे हें कोणीहि कबूल करील. बहिणीनें आणि मेहुण्यानें परोपरीनें सांगून पाहिलें, पण विनूला सोलापुरीं महाबळेश्वराची स्थापना झाल्यासारखें वाटत होतें कीं काय कुणास ठाऊक, त्याचा आपला एक ध्यास– 'उद्यां Madras गाडीनें मी जाणार.'

पण आपण एक चिंतीत असतो आणि दैव दुसरेंच कांहीं तरी करून ठेवीत असतें. उद्यां गांवाला जायचें म्हणून विनूनें सर्व जय्यत तयारी केली. फाटक्या कागदांचा ढिगारा बांधून बहिणीला बहाल केला. चिंधी, तुकडा सर्व कांहीं एके ठिकाणीं रचून ठेवलें. फणी, कंगवा वगैरे सामान ट्रंकेंत दाबून बसवलें आणि उद्यांच्या दिवसाची आणि उद्यांच्या Madras गाडीची मनांतल्या मनांत कल्पना बांधीत तो झोपीं गेला.

सकाळीं सहाच्या सुमाराला विनू माडीवरून खालीं येतो तों भगवान् सूर्यनारायणाच्या आगमनाच्या आधींच त्याचे वडील बाहेर ओसरीवर येऊन बसलेले त्यास आढळले. विडीच्या धुरानें ओसरीवर धुकें पडल्याचा भास होत होता. अजून थोडासा काळोखच होता, पण विनूनें तावडतोब आपल्या वडिलांचें आगमन जाणलें.

विनूला सोलापूरला घेऊन जाण्याकरतां म्हणूनच काका पुण्यास आले होते. जाणत्या-सवरत्या मुलाला घरीं नेण्याकरितां जेव्हां आपण होऊन पिता दोनशें मैल धडपडत येतों तेव्हां येण्याचें कारणहि तसेंच विशेष असावें लागतें; आणि तें पुढच्याच वाक्यांत दिसून आलें.

" हें पहा नानासाहेब, माझा तसा कांहीं शिक्षणाच्या विरुद्ध ग्रह नाहीं. अन् मुलगी म्हणाल तर चिमखडी आहे पोर. हिनं पहिलीन्. मीं पाहिली. आतां फक्त विनूचाच काय तो प्रश्न राहिला आहे. त्याला एकदां पसंत पडली म्हणजे मग पुढं ठरवाठरवीचे प्रश्न—, काय? मुलीचा भाऊ– अहो तो वामनराव आपला,——कस्टमखात्यांत होता पहा,——तो आला माझ्याकडे. तें

कांहीं विचारूं नका. मुलीकडचीं माणसं,— गरजू असतात,—- सात जन्मां-पूर्वींची ओळख उकरून काढतात. मुलीला आईबाप कोणी नाहींत पण भाऊ आहे,—भावाची बायको,—चार मुलं. फारसं देईलसं दिसत नाहीं; पण नाना-साहेब, माझं आपलं अलीकडे असंच मत बनत चाललं आहे, कीं पोराला पसंत पडली पोरगी कीं, मग बाकीच्या निरर्थक गोष्टींचं घोडं पुढं दामटण्यांत अर्थ नाहीं; समजलं कीं नाहीं मी काय म्हणतों तें,—अं?"

नानासाहेब आपल्या श्वशुरांच्यापुढें हातांतल्या जळक्या काडीनें दातांची साफसुफी करीत होते आणि प्रसंगानुरूप 'हूं', 'उंहूं' म्हणून मान हलविल्या-सारखें करीत होते. विनूला पाहिल्याबरोबर नानासाहेब मोठ्यानें हसूं लागले. विनूला त्या हसण्याचा थोडाबहुत बोध झाला. पण वयानें लहानपण पत्करलें असतां असल्या उद्वेगजनक हास्याकडे दुर्लक्ष करण्यापलीकडे विनूच्या हातांत दुसरें काय होतें—?

"आले, जांवईबुवा आले. या—या हो, असे इकडे बसा—" नानासाहेब म्हणाले.

विनू मद्रास गाडीनें सोलापूरला त्या दिवशीं गेलाच. न जाऊन सांगतो कुणाला? वडिलांनीं मुलीचें नांव उच्चारायचा अवकाश! विनू दचकलाच. मंजिरी? —मंऽजिऽरीऽ?—हा काय गोंधळ?—का स्वप्न? का थट्टा—?

वडिलांनीं अगदीं स्पष्ट सांगितलें! —मंजिरी!—होय, कॉलेजांत पहिल्या वर्षांत पास झालेली!—वामनरावांची धाकटी बहीण. सदाशिव पेठेंत घर आहे त्यांचें! पण विन्याला इतकी चौकशी करण्याचें काय कारण?

विनूनें कोणत्याच प्रश्नाला उत्तर केलें नाहीं. त्याला कशावरसुद्धां विश्वास ठेवावेंसें वाटेना. पण सोलापूरला जाण्याची त्याची आतुरता मात्र पाहण्याजोगी होती. संध्याकाळीं आठ वाजतां सोलापूर—अन् उद्यां सकाळीं आठ वाजतां?—

* * *

विनूचें लग्न लागलें. सहधर्मचारिणी म्हणून सहशिक्षण घेणारी मंजिरी विनूच्या घरांत इतस्ततः वावरूं लागली. विनूला आतां नवीनच प्रश्न त्रास देऊं लागला. बोलण्याला सुरुवात कशी करावी? आधीं कोण बोलणार?

असल्या नाजूक गोष्टींमध्यें सल्ल्याची सहसा उणीव पडत नाहीं, पण सल्ला देणें आणि सल्ल्याप्रमाणें वागणें यांत पुष्कळच तफावत असते. पुन्हा कैक वेळेला अशी भानगड असते, कीं हे सल्ले परिणामीं हितकर ठरणारे असले तरी आचरणांत आणायचे कसे, हें कुणीच समजावून सांगत नाहीं. बरें, सगळा पोरासोरी कारभार! जो तो आपआपल्या विनोदशक्तीकडे पाहून एकापेक्षां एक वरचढ सल्ले देतच असतो. पण एका गाढवाला समजत नाहीं, कीं तूं केलेंस म्हणून सर्वांनींच तसें करावें, असा कांहीं कुठें कायदा नाहीं. —नवीन नवीन मसलती पुढें येऊं लागल्या म्हणजे वेळप्रसंगीं फाटक्या डोक्याचा मनुष्यसुद्धां कसा कविकल्पना बोलूं लागतो हें चांगलेंच प्रत्ययास येतें.

सुमारें एक आठवडा गेला, सोमवार जाऊन मंगळवार उगवला. मंगळवारचा बुधवार व्हायला साठ मिनिटांचा एक असे पक्के चोवीस तास लागले. बुधवार आणि गुरुवार यांच्यांत सुमारें तीनशेंपासष्ट दिवसांचा अवधी लोटल्यासारखें होऊं लागलें. विनूला तो आठवडा अत्यंत वाईट गेला. वेळ जातां जाईना. घड्याळाकडे पाहावें तों घड्याळाच्या पाठीमागें एखादा राक्षस उभा राहून घड्याळाचें नरडें दाबून धरीत आहे असेंच विनूला वाटे. एकदां तर आवेशाच्या भरांत घरांतील दोन्ही घड्याळांचे कांटे त्यानें दोन तास पुढें सरकावून दिले. त्या दिवशीं विनूच्या घड्याळाप्रमाणें रात्रीं साडेआठ वाजतां सूर्यास्त झाला. अर्थात् असल्या घाईमुळें अर्थ साधणें तर दुरापास्तच पण वेळीं अनर्थ ओढावयाचा, या विचारानें जगाच्या पुढें दोन तास भटकणारा विनू पुन्हा जगाबरोबरच चालूं लागला. धडाडीचें अवसान आणून जगाला थक्क करून सोडण्याचे विचार त्याला बाजूस ठेवणें भाग पडलें.

शेवटीं विनूनें निश्चय केला. ऐन थंडीच्या दिवसांत सकाळच्या प्रहरीं गार पाण्याची तपेली पाठीवर ओतून घेतांना ज्याप्रमाणें सर्वांग प्रेमभरानें डोलूं लागतें त्याप्रमाणें विनूची अवस्था झाली. ठराविक मर्यादेपर्यंत विनूचा धीर टिकत असे, त्यापुढें विनूची स्थिति फारच करुणास्पद होई. त्यापेक्षां साधा सरळ मनुष्य पत्करला. कांहीं कांहीं व्यक्तींमध्यें हें फार स्पष्टपणें दिसून येतें. त्यांची धडाडी, त्यांचें साहस, त्यांच्या मनाची बळकटी ठराविक कक्षेच्या बाहेर ताणली गेली, कीं मग कुत्रा त्यांचे हाल खायला तयार नसतो.

विनू सकाळपासून विचार करीत होता. उद्यां मंजिरी माहेरीं जाणार होती. आजच्या आज कांहीं तरी सूतउवाच झालेंच पाहिजे. पुन्हा विनूला दैवानें हात दिला. मंजिरी किती वाजले तें पाहायला म्हणून ओसरीवर आली होती. शिक्षण झालें म्हणून ह्या नव्या नात्याची कल्पना कांहीं नाहींशी होत नाहीं. विनूला पाहिल्याबरोबर Danger zone (धोक्याची जागा) मध्यें सांपडलेल्या सैनिकाप्रमाणें ती गांगरून गेली.

विनूनें आजूबाजूस पाहून पटकन् म्हटलें, "काय पाहिजे—?"

मंजिरी जास्तच गोंधळली. कॉलेजमधलीं नातीं निराळीं होतीं. आतां ती नव्या नात्यानें त्याच्यापुढें उभी होती; आणि या नव्या नात्यांतील हा पहिलाच बोलण्याचा प्रसंग होता. कॉलेजमध्यें असतांना ती 'Well played, Mr. Barve' असा खुशाल त्याच्या नांवाचा उच्चार करी. आतां त्याला काय हाक मारणार–? या सर्व गोष्टी डोळ्यांपुढें उभ्या राहून ती गोंधळल्यासारखी झाली.

विनूनें पुनश्च पूर्वोक्त प्रश्नार्थक वाक्य उच्चारलें. मंजिरीनें कसेंबसें उत्तर केलें आणि तेथून पळून जाण्याकरतां तोंड फिरविलें. विनायक चटकन खुर्चीवरून उठला.

"उद्यां माहेरीं जाणार तें केव्हां परत येणार?" विनू म्हणाला.

"दोन दिवसांनीं—" मंजिरीनें मागें वळून उत्तर केलें.

पुन्हा नवीन विषय काय काढावा हा प्रश्नच पडला. नूतन पत्नीशीं बोलायचें म्हणजे काय बोलावें याची सहा महिने तालीम घेतली तरी आयत्या वेळेला 'सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति' असला विलक्षण प्रकार घडतो. बोलून बोलायचें तर हवामानाविषयीं तर बोलायचें नाहीं ना? पहिल्या प्रसंगीं असें कांहीं ठराविक नियम असते तर जगावर किती उपकार झाले असते– हा विचार विनूच्या डोक्यांत भ्रमण करीत होता.

मंजिरीनें दोन मिनिटें वाट पाहिली; पण अशी बोलत उभी राहिलें तर चटकन् कुणी तरी येईल अन् मग त्यांच्या जिभा आवरतां आवरतां पुरेसें होईल, हा विचार येतांक्षणींच ती परत फिरली. पण इकडे विनूचे प्राण कंठीं आले.

"हें पहा,— जेवणं झाल्यावर मला कांहीं बोलायचं आहे—" पण आतां झालेल्या कौतुकास्पद करामतीची कल्पना डोळ्यांपुढें उभी राहतांच विनू शरमिंधा झाला. मंजिरीनें आश्चर्यानें विस्फारलेल्या नेत्रांनीं त्याच्याकडे हसून पाहिलें. चाणाक्षपणामध्यें नांवाजलेल्या स्त्रीजातींत जन्मास आलेली मंजिरी तत्काळ मनांत समजली. विनूला काय बोलायचें आहे तें त्यानें न बोलतांच तिनें ताडलें. 'बरें' म्हणून मंजिरी 'सूं' घरांत पळाली.

* * *

आतांपर्यंत विनूला दैवानें चांगलाच हात दिला होता, —पण यापुढें हात देण्यापेक्षां हात दाखविण्याची क्रिया त्याला जास्त पसंत पडूं लागली. त्याला वाटलें, आतां काय राहिलें आहे?—मंजिरी घरांत आहे.—बी. ए. झाली आहे. वडिलांनीं पैशाची योग्य निगा राखली आहे. झालें—आयुष्यांतलें कार्य संपलें, असेंच त्याला वाटूं लागलें. पण एके दिवशीं मंजिरीनें त्याला जागें केलें. इतक्या जोरानें तिनें त्याला हलवून जागें केलें, कीं विनू क्षणमात्र गडबडला.

परक्या मुलखांत एकदम गेलों म्हणजे पहिले चार दिवस तरी आपण भोंवतालच्या परिस्थितीचें निरीक्षण करण्यांत गुंतलों जातों. त्याप्रमाणेंच मंजिरी सुमारें एक वर्षपर्यंत आजूबाजूनें आढावे काढीत होती. ती विनूच्या मर्जी-बाहेर चुकूनसुद्धां जात नसे. आल्यागेल्याला काय हवें—नको पाहणें, सासू-सासऱ्याची मर्जी संभाळणें, नवऱ्याच्या पुढें पुढें करणें या सर्व कामांत मंजिरीनें कल्पनातीत कौशल्य दाखविलें. पण मनामध्यें तिचा निश्चय कायम होता. तो निश्चय मूर्त स्वरूपाला आणण्याची पूर्वतयारी म्हणूनच या गोष्टी ती करीत होती. आजूबाजूच्या लोकांचा तिनें पूर्णपणें अंदाज बांधला आणि एके दिवशीं दुपारच्या प्रहरीं विनूपुढें तिनें आपली इच्छा दर्शविली.

प्रथम प्रथम विनूला मंजिरेचें भाषण म्हणजे थट्टाच वाटली. पण जेव्हां का तिनें हक्काची भाषा वापरण्यास सुरुवात केली तेव्हां मात्र विनूची पांचांवर धारण बसली! तरी पण पुष्कळशा गोष्टी अशा असतात, कीं त्यांच्याकडे पूर्ण दुर्लक्ष केलें असतां आपोआप कामें होऊन जातात. विनूला ह्याचा चांगलाच अनुभव होता. वडिलांच्याकडून एखादे वेळेस सुंदरसें व्याख्यानवजा पत्र येई,

पण विनू अशा पत्राचें उत्तर बिलकूल धाडीत नसे. कांहीं काळ लोटला, कीं पुन्हा गाडी रुळावर येई, वडिलांचा राग जाई, आणि पैशाची पुरचुंडी पुण्यास येई. आगीवर पाणी टाकून आग विझवण्याची कला माहीत नसेल, तर निदान तेल टाकून ज्वाला प्रदीप्त करण्याचें तरी श्रेय घेऊं नये, या विचारांचा तो थोडा-बहुत अनुयायी होता. मंजिरेच्या या नवीन मागणीकडे त्यानें प्रथम काना-डोळाच केला. म्हणजे खरोखरच, कानानें नुसतें ऐके आणि डोळ्यांनीं तिच्या आवेशपूर्ण मुद्रेकडे पाही. येवढें उरकलें कीं मग जसें काय ती कोणत्या भाषेंत बोलली राम जाणे, अशा कांहींशा बावळया मुद्रेनें तिसऱ्याच गोष्टीकडे लक्ष पुरवी. पुढें पुढें त्याला थट्टा सुचूं लागली.

" बरें पण, मंजे, तूं शिकून काय करणार आहेस ?—तूं शीक,—लागेल तितकें शीक. कांहीं हरकत नाहीं. अग, शिकण्याकरतांच तर आपण जन्म घेतला आहे. तो कोणतासा कवि म्हणतो, कीं आपण मेरपर्यंत विद्यार्थिदशेंतच असतो म्हणून ! —झालें तर. तुझ्या शिक्षणाविरुद्ध अकांडतांडव करून तुझा हिरमोड करण्यांत मला कांहीं मोक्ष मिळणार नाहीं कीं कांहीं नाहीं. पण माझी एक अट आहे, शिकणं झाल्यावर तूं नोकरी केली पाहिजेस."

मंजिरीला विनूची थट्टा बिलकूल रुचत नव्हती.

" तूं नोकरी कर, मी घरीं बसेन. तूं हपिसांतून आलीस, कीं चहाचा कप घेऊन तुझ्यापुढं येईन. मांजिरी, मी कांहीं सनातनी धर्माचा मनुष्य नाहीं. आजपर्यंतची जगाची वहिवाट अशी होती, कीं पुरुषांनीं बाहेरचीं कामं पाहायचीं अन् बायकांनीं घरं संभाळायची; आतां तुम्हां बायकांना घरं संभाळ-ण्याचा कंटाळा आलेला दिसतो आहे, साहजिकच आहे. तेंच तेंच करून मनुष्याला कंटाळा येणं अगदीं स्वाभाविक आहे. तर आतां आम्हीं पुरुषांनीं घरं संभाळावींत असंच तुझं म्हणणं ना ?—" विनू म्हणाला.

" मला तें कांहीं समजत नाहीं;– मी तसं कांहीं म्हणत नाहीं. फक्त—" मंजिरी सडेतोड आवाजांत म्हणाली.

" अग, पण ऐकून तरी घे— तेव्हां माझं म्हणणं काय, कीं तुम्हीं बायकांनीं आतां पुरुषांसारखं हपिसांत फायलींच्या ढिगाऱ्यांत डोकीं खुपसून बसावं, अन् आम्हीं पुरुषांनीं घरांत बसून अळवाच्या भाजीला पीठ लावून

वाढावी का तशीच वाढावी, ह्या कोड्याचा उलगडा करण्याच्या नादास लागावं. मी म्हणतों, काय हरकत आहे? आपण पूर्वीचा प्रकार आजपर्यंत करीत आलोंच आहोंत. आतां ह्या नवीन प्रकारचा अंदाज बघावा. नाहीं जमलं तुम्हांला तर आम्हीं आहोंतच. हें बघ, मंजे, व्यक्तिस्वातंत्र्याचा मी पूर्ण चाहता आहे. तुला शिकायचें आहे ना? शीक. कुछ फिकीर नाहीं. मला अलीकडे चार दिवस अळवाची भाजी स्वतः करावंसं वाटूं लागलं आहे. मग काय? —उद्यां आईची परवानगी काढ—, आपण चार दिवस ह्या नवीन मार्गाचं अवलंबन करूं—!"

मंजिरीनें आपला हेका सोडला नाहीं. बी. ए. होण्याच्या रम्य कल्पनेंत ती गुंगली होती. विनूच्या थट्टेनें तिच्यावर अगदीं उलट परिणाम झाला. आपल्या शिकण्याच्या इच्छेच्या मार्गांत विनू हा शत्रु आहे असें तिला वाटूं लागलें. त्याचीं थट्टेखोर भाषणें तिला मानभावीपणाचीं वाटूं लागलीं. विनूच्याविषयीं पूर्वीं तिचें मत फार चांगलें होतें. प्रत्येक तरुण मुलगी दुसऱ्या कुणालाहि न कळवितां आपल्या भावी सहचराची मनांतल्या मनांत पुसट पुसट रूपरेखा आंखून ठेवीत असते; प्राण गेला तरी ती कबूल करणार नाहीं. मंजिरेनें लहानपणीं, वयाच्या दहाव्या अगर अकराव्या वर्षींच एक मुलगा सायकलवरून झपाट्यानें जातांना पाहिला. त्या वेळेला तिला त्याच्या सायकलवरून जाण्याचें कौतुक वाटलें. लहानपणीं— अर्थात् यापलीकडे तिला फारसें कांहीं वाटलें नाहीं. पण वयाच्या अठराव्या वर्षी तिनें विनूला क्रिकेट खेळतांना पाहिलें त्या वेळेस, तिला त्या पूर्वीच्या मुलाची आठवण झाली. तिला विनूचें कौतुक वाटलेंच, आणखी— स्वतःच्या मनाशींसुद्धां तिनें कबूल केलें नव्हतें हें, थोडेंसें कांहीं तरी निराळेंच वाटलें आणि त्या भरांत ती Well played, Barve म्हणून गेली. लहानपणीं तिनें ज्या प्रकारच्या मुलाविषयीं आपल्या मनांत खूणगाठ बांधून ठेवली होती त्या प्रकारचा मुलगा तिला भेटला होता. नशिबानें सर्वच कांहीं मनाजोगतें घडून आलें. विनू आतां तिच्या मालकीचा होता. लग्नाचें ठरल्यापासून तिनें हजारों विचार ठरवून ठेवले होते. त्यांपैकीं एक विचार शिक्षणाचा होता; आणि विनू आपल्या इच्छेच्या आड येणार नाहीं अशी तिनें आपल्या मनाची समजावणूक करून घेतली होती. पण दिसतें तसें असतें तर जगाचा प्रश्न तेव्हांच सुटला असता. विनूच्या मनाविषयीं,

त्याच्या ध्येयाविषयीं विचार करण्याची तिला जरूरीच भासली नाहीं. विनूला आपण सांगायचा अवकाश, कीं विनू आपल्या म्हणण्याप्रमाणें करील ही तिची समजूत चुकीची ठरण्याचा रंग दिसूं लागला. आपलें ध्येय साध्य होत नसलें म्हणजे साहजिकच संताप येत असतो. विवक्षित ध्येयाच्या मार्गे लागणाऱ्या व्यक्ति नातेंगोतें सब झूट मानीत असतात. मंजिरी विनूला येवढ्याचकरतां शत्रु समजत होती. आणि येवढ्याचकरतां हक्कांची जाणीव झालेल्या भाबड्या मंजिरीनें विनूच्या संसाराची राखरांगोळी केली. भावनाप्रधान जीव कांहीं तरी डोक्यांत घेऊन बसतात; आणि विचार न करतां आपल्याबरोबर आपल्या आजूबाजूच्या जीवांचासुद्धां निष्कारण बळी घेण्यास कारणीभूत होतात.

* * *

होतां होतां वादास चांगलाच रंग चढला. मंजिरी आपला हेका सोडण्यास कोणत्याच अटीवर कबूल नव्हती. विनूनें मंजिरीला मोडून काढण्याचा निश्चय केला होता. दोघेंहिजण आप-आपल्या बाजूकडून सावधगिरीनें राहण्याचा प्रयत्न करीत होतीं.

* * *

— आणि विनू ह्या सर्व गोष्टींचीं प्रमाणें बांधीत पुस्तक छातीशीं धरून ईझीचेअरवर पडला होता. ह्या चमत्कारिक परिस्थितींतून काय मार्ग काढावा हेंच त्याला समजत नव्हतें. आजपर्यंत स्त्रियांचें शिक्षण, हक्क वगैरे वगैरे लट्ठंभारती शब्द त्याला माहीतसुद्धां नव्हते. पण आज तेच शब्द त्याच्या मानगुटीं बसून त्याची गळचेपी करूं पाहत होते. त्यानें स्वतःच्या गुणदोषांचें त्रयस्थ या नात्यानें पृथक्करण करण्यास सुरुवात केली. काय त्याच्या अंगांत विशिष्ट गुण होते ? कांहीं नाहीं ! मुंबई विश्वविद्यालयाच्या डिग्रीचा हातभर लांबीचा कागद मिळविण्यापलीकडे बी. ए. होऊन त्यानें काय मिळविलें होतें ? कांहीं नाहीं ! क्रिकेटमध्यें चारदोन खेपेस लोकाच्या गुणग्राहकतेचा स्वाद चाखला होता. पण त्याबरोबरच निंदेचा अहेरहि त्याला पत्करावा लागला होता. "अरे हड्–काय तुझा बर्वे खेळतो माहिती आहे. चार चान्सेस देऊन कुणीहि शेंबडं पोरगं शंभर रन्स काढील–" इत्यादि, इत्यादि. पाठीमागें उच्चारलीं जाणारीं प्रशंसात्मक वाक्यें त्याच्या कानांवर आलीं होतीं. म्हणजे एकूण काय तर विनूची लायकीच नव्हती.

पण पुन्हा विनू विचार करूं लागे. मंजिरी तरी काय एवढी सद्‌गुणांची पुतळी लागून राहिली आहे ? कॉलेजमध्यें पहिलें वर्ष पास झाली म्हणून कांहीं स्वर्ग मिळवला नव्हता तिनें. चारदोन मुद्द्यांवर, लोकांच्या चोरलेल्या भाषणांच्या जोरावर, चारदोन वाक्यें बोलतां आलीं म्हणजे कांहीं शिक्षण म्हणत नाहींत. नाहीं म्हणायला विनूला तिचा एक गुण दिसत होता; पण तो गुण तरी कसा म्हणावा ?—रूप ही ईश्वराची देणगी आहे. मंजिरी सुंदर आहे हा कांहीं तिचा गुण नव्हे खास !

मंजिरीच्या अंगावर वसकन् ओरडलें तर काय होईल याचा विनू विचार करूं लागला. मंजिरी कदाचित् रागावून माहेरीं निघून जाईल. चार दिवसांनीं राग निघून गेला म्हणजे चट घरीं येईल. आणि तिनें जिवाचें बरेंवाईट करून घेतलें तर ?

विनूच्या अंगावर शहारे आले. मंजिरीला धाकांत ठेवून तिला आपलें म्हणणें सोडण्यास भाग पाडणारा विनू तिच्या जिवाचें वाईट व्हावें असें कधींच चिंतीत नव्हता. सव्वादोन तास विचार करूनसुद्धां विनूला कांहींच सुटवणुकीचा मार्ग सापडेना.

जरा वेळानें मंजिरी आंत आली. विनूनें तिच्याकडे पाहिल्या न पाहिल्या-सारखेंच केलें. मंजिरीची मुद्रा करारी दिसत होती. दोघांनाहि एकमेकांच्या मनांत चाललेल्या वादाची पूर्णपणें जाणीव होती. पण सुरुवात करण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेण्यास कोणीच तयार नव्हतें. शेवटीं विनूनें शान्तपणें प्रश्न टाकला--

" इतक्यांत काम झालं सगळं—? "

" मी कांहीं मोलकरीण नाहीं सारा दिवसभर केरवारे करीत हिंडायला ! " मंजिरीनें त्रासिक मुद्रेनें उत्तर केलें. विनूनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. मंजिरीनें पुन्हा सुरुवात केली—

" सकाळीं उठावं—चहापाणी करावं. दुपारीं जेवणंखाणं—नंतर डाळ-तांदूळ. संध्याकाळीं दिवाबत्ती, झाडलोट—. हक्काच्या मोलकरणी आहोंत आम्ही बायका म्हणजे. पुरुषांनीं मात्र आयतोबासारखं बसून 'यंव कर'

'त्यंव कर'—'अजून नाहीं झालें?'–असं डोळे फाडीत ओरडावं! बायकांच्याविषयीं पुरुषांची काय—कल्पना तरी काय आहे—? टांग्याला जुंपलेलीं जनावरं तरी आमच्यापेक्षां बरीं—!"

"तुझं म्हणणं तरी काय आहे—?" तिच्याकडे पाहून विनूनें म्हटलें.

"मीं एकदां सांगितलें आहे. पुनः पुन्हा विचारण्यांत काय आनंद वाटतो आहे तुम्हांला? मी—" म्हणून मंजिरीनें आपलें भाषण तसेंच लोंबकळत ठेवलें.

"आनंद वाटतोय् मला नाहीं—? बायकोच्या शिव्या खाण्यांत अगदीं आनंदाचा साठाच असेल कीं नाहीं—?" विनू किंचित् चढत्या आवाजानें म्हणाला.

"पण मी जास्ती शिकूं लागलें तर तुमचं त्याच्यांत काय बिघडतं आहे? स्त्रियांनीं शिकावं असं तुमचंहि मत आहे, नाहीं का—?" मंजिरी म्हणाली.

"लग्न झाल्याबरोबर नवऱ्यानं स्वतःच्या मतांना मूठमाती देऊनच संसाराला आरंभ करावयाचा असतो— अन् त्यांतून माझ्या मताची तुला काय किंमत आहे?"

"किंमतीचा प्रश्न मुळीं मीं काढलेलाच नाहीं. अन्—पण मी शिकणार, यांत तुमचं काय नुकसान आहे—?"

विनू थोडा वेळ कांहींच बोलला नाहीं. नंतर जोरानें म्हणाला,

"मंजिरी, मी तुला सांगून ठेवतों, कीं आतां तूं शिक्षणाचं विसरून जा. जोंपर्यंत तूं मोकळी होतीस तोंपर्यंत मीं तुला शब्दानंसुद्धां विचारलं नव्हतं; पण आतां बदललेल्या नात्याबरोबर मला नाइलाजानं तुला सांगावं लागत आहे. माझ्यासमोर तूं पुन्हा शिकण्याचं नांव काढलंस तर परिणाम कांहीं बरा होणार नाहीं—"

"माराल मला होय—? येऊन जाऊन परिणाम वाईट वाईट तो दुसरा काय होणार? चारदोन तोंडांत मारून मालकीचा हक्क गाजवणार, एवढंच ना—?" मंजिरी थांबली.

" मंजिरी,—आजपर्यंत मीं तुला तसें वागवलें नाहीं आणि यापुढेंहि तसें वागवायची माझी बिलकूल तयारी नाहीं. माझ्या शब्दांचे विपरीत अर्थ काढण्याची तुला हौसच असेल तर त्याला माझा नाइलाज आहे. आजपर्यंत–"

विनूनें वाक्य अर्धवटच सोडलें. विनूनें बोलण्याचें बंद केलें तरी पण त्याच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजलें होतें. पुष्कळ बोलावें असें त्याला सारखें वाटत होतें; पण मंजिरीच्यापुढें बोलण्याचा त्याला धीरच होईना.

" माझ्या बरोबरीच्या सगळ्या मुली या वर्षी इंटर पास झाल्या. मीच काय पाप केलं होतं म्हणून—" मंजिरी अर्धवट संतापी, अर्धवट केंविलवाण्या मुद्रेनें म्हणाली.

" तूं नाहींस– मींच पाप केलं आहे; म्हणून हे कर्मभोग उभे राहूं लागले आहेत. मंजे, तूं शिकून काय करणार आहेस ?— उच्च ज्ञान मिळवायला परीक्षेच्या चरकाची काय जरूरी आहे ? घरांतल्या घरांत नाहीं का— ?" विनू उद्वेगानें म्हणाला.

" घरांत ना ? —घरांत राहून सुमाताच व्हायला शिकवणार कीं नाहीं ? बायकांची किंमत चूल, मूल– कधींमधीं फूल आणि वस्त्रांची झूल, यांपलीकडे काय आहे ?— तें मला बिलकूल पसंत नाहीं. मला जगांत आल्यासारखं कांहीं तरी करून दाखवायचं आहे— मला इतर बायकासारखं सैंपाकघरांतून माजघर आणि माजघरांतून सैंपाकघर असं बिलकूल करायचं नाहीं !" मंजिरी म्हणाली.

" मंजिरी, पण तूं लक्षांत घेत नाहींस, कीं तुझं लग्न झालेलं आहे ! विवाहित स्त्री म्हटली म्हणजे तिच्यावर थोडीबहुत जबाबदारी येऊन पडत असते. तुला कांहीं तरी करून दाखवण्याची इच्छा आहे, पण ही जबाबदारी न ओळखल्यानं कांहीं तरीच करून दाखवशील मात्र ! मंजिरी, तुला स्पष्ट सांगूं ? तूं मला स्वार्थी म्हण, काय वाटेल तें म्हण, –पण मंजे, तूं नेहमीं माझ्याजवळ असावंसं आणि आपण दोघांनींहि गुण्यागोविंदानं, एकमतानं राहावं अशी माझी मोठी इच्छा आहे. मंजे, नवऱ्याला इतकं हिणवणं चांगलं नाहीं. मंजे, तूं जवळ नसलीस तर मी––"

" या बोलण्यांत कांहींच अर्थ नाहीं. तुम्हांला जर माझ्याविषयीं इतकं वाटत असेल तर मग माझ्या आकांक्षेच्या विरुद्ध येऊन माझा असा हिरमोड कां करतां ? "

" मला तूं उगीच त्रास देऊं नकोस.--माझं ऐकायचं नसलं तर तुला काय वाटेल तें कर, जा." —विनूनें रागानें पुस्तक कोपऱ्यांत भिरकावलें.

विनू इतका चिडेल ही कल्पनाच मुळीं मंजिरीला नव्हती. ह्या त्याच्या अदृष्टपूर्व चिडण्याला पाहून ती गोंधळून गेली. विनूनें त्याच आवेशानें सुरुवात केली—

" शिकलेल्या धेंडाशीं लग्न करणं म्हणजे विस्तवाशीं खेळणं हेंच खरं. चार गप्पा मारायला चांगली ठरणारी मुलगी, लग्न झाल्यावर नवऱ्याच्या मर्जीनं वागेल ही कल्पनाच नको! जा, कुठंहि भीक माग.--मला त्याची पर्वा नाहीं. कोणा परमेश्वरानं तुला हें रूप देण्याचा गाढवपणा केला असेल कुणास ठाऊक! त्याच्या जोरावर माझ्या आयुष्यांत येऊन पडलीस. नसेल तुझ्या-माझ्या अदृष्टांत,—माहेरीं जातेसच आहेस. --सुखरूप जा. तिकडे बी. ए. हो, नाहीं तर मास्तरीण हो. तूं आणि तुझं नशीब. कांहीं तरी करून दाखवणार आहे म्हणे!—काय करून दाखवणार आहांत आपण ?—आजपर्यंत काय दिवे लावले आहेत ते आत्तां तुम्हांला ही आठवण झाली आहे ? नवऱ्याच्या जिवावर उड्या मारायच्या अन् हक्कांची भाषा वापरायची! —लहानपणीं बापाला काळ, मोठेपणीं नवऱ्याची आबाळ, म्हातारपणीं हातांत जपमाळ हें करतां करतां जन्म गेला तुम्हा बायकांचा—!"

शक्य असतें तर मंजिरीनें विनूची दशादशा करून सोडली असती. मंजिरी खरोखरीच संतापली होती. काय, काय म्हणून बोलायचें विनूनें ठेवलें होतें ? तिच्याबरोबर जगांतल्या यच्चयावत् स्त्रियांना त्यानें हजेरीला बोलावलें होतें. लग्न झालें म्हणून काय झालें, अन् लग्न झाल्यावर शिकूं नये हा कुठला कायदा ? —अन् त्याच्याकरतां येवढी चिडाचिडी ?—अन्नवस्त्र देतात म्हणजे काय उपकाराचें ओझें का लादतात आमच्या डोक्यावरती ? त्यांना गरज आहे म्हणूनच ते तरी धडपडत येतात ना ? मग ही मगरूरीची भाषा काय म्हणून ?

मंजिरी प्रत्येक प्रश्नागणिक विचार करीत होती. पण उत्तर एकच. पुरुषांना स्वार्थाशिवाय दुसरें-तिसरें कांहीं दिसत नाहीं. जोंपर्यंत बायको पुढें पुढें करून साहेबमजकुरांची मर्जी संभाळण्याकरतां धडपड करीत आहे तोंपर्यंत ठीक. जरा कुठें बिघडलें कीं, 'तूं मेलीस तरी पर्वा नाहीं!' काय न्याय आहे! नवरा हसला, कीं आपणहि मोठ्यानें हसायचें. नवरा दुःखी दिसला, कीं आपण ओक्साबोक्शीं रडायला सुरुवात करायची. हेच बायकांचे हक्क?— खरें आहे!

केवळ इतक्यांतच आपल्या जन्मदात्यांना या अश्रुतपूर्व लढ्याचा सुगावा लागूं देणें योग्य नव्हे म्हणून विनू मंजिरीला घेऊन पुण्यास गेला. तरुण नवराबायको मिळून टांग्यांतून कोठेंहि जातांना वृद्ध माणसांना मोठें कौतुक वाटतें. माझा कौतुक हा शब्द माघारीं घेतों. कारण नीट पाहिलें तर कौतुकापेक्षां प्रेमाचें भरतें येतें असें दिसून येईल. कदाचित् त्यांनाहि आपल्या 'त्या' दिवसाची आठवण होत असल्यास न कळे! सर्वसाधारण नियमाला अनुसरून विनूच्या आईबापांनाहि पोरांची दृष्ट काढावीशी वाटल्यास नवल नाहीं. विनूला आईनें एकदां नाहीं हजारदां बजावून सांगितलें, आणि तेंसुद्धां 'हो, बरें आठवलें' अशा मुद्रेनें—"विनू, जपून ये हो, मुलीला खिडकीबाहेर वांकूंबिकूं देऊं नकोस.—नाहीं तर जाशील तूं आपला चढण्याउतरण्याच्या ऐटींत—अन्—"

"आई, तुझी कल्पनाशक्ति अलीकडे फार मंदावल्यासारखी दिसते आहे. मुलगी तुझ्या कल्पनेबाहेर शहाणी आहे. मला संभाळण्याची सुद्धां तिची तयारी आहे."

अर्थात् आईला या शब्दांतील खोच समजणें शक्यच नव्हतें. मंजिरी मात्र मान फिरवून उभी राहिली आणि जसें कांहीं ऐकलेंच नाहीं असें दर्शवण्याकरतां दरवाजाच्या कडीचें कोडकौतुक पुरवण्यांत गुंग झाली.

"अग, कडी नको वाजवूंस." आईनें म्हटल्याबरोबर 'काय मेला त्रास' असें डोळ्यांनीं दर्शवीत मंजिरी हातांतल्या बांगड्यांशींच खेळूं लागली.

काल्च्या प्रकारापासून विनू मंजिरीशीं बोलतांना आदरार्थी बहुवचन वापरूं लागला होता आणि तेंसुद्धां कारणपरत्वें. मंजिरीला प्रथम प्रथम कसेंसेंच वाटलें. विनूनें आपल्याला असें तुसड्यासारखें वागवावें हें पाहून

तिला थोडेंसें वाईट वाटलें. रात्रभर तिच्या डोक्यांत याचा विचार चालू होता. विनूला तर खूष ठेवायचें, अन् शिक्षणाचेंहि झालें पाहिजे. दोन्ही एकदम कसें जमावें? —विनूला चिडवायचें नाहीं म्हटलें तर मुकाट्यानें चार बायकांप्रमाणें आपणहि हातांत पळी घेऊन चुलीशीं बसलें पाहिजे. बी. ए. होण्याच्या नादाला लागावें, तर विनू काय करील कोण जाणे? विनूच्या रागाला ती फारशी भीत होती अशांतला प्रकार नाहीं. अं:! काय करणार आहेत माझे?— तरी पण शिकलेल्या माणसाला दुसऱ्याच्या भावनांविषयीं थोडासा तरी विचार करावेंसें वाटूं लागतें. मंजिरीला बी. ए. तर व्हावयाचें होतें— पण साधल्यास विनूहि तिला पाहिजे होता; आणि म्हणूनच विनू जेव्हां आपपरभावानें वागूं लागला तेव्हां तिला थोडेंसें आपण कांहीं चुकत तर नाहीं ना, असें राहूनराहून वाटूं लागलें. रस्ते फार सुंदर असल्यामुळें सहजच हिसक्यानें विनूचा हात तिच्या पाठीवर पडला. तिला खरोखरीच आनंद वाटला. पण पुढच्या क्षणींच जेव्हां विनूनें हात काढून घेतला तेव्हां तिला पुन्हा कसेंसेंच झालें.

* * *

सुधारलेल्या विचारांचें माहेरघर पुणें असें समजण्याचा प्रघात आहे खरा, पण विनूच्या मनावर पुण्याच्या हवेचा मुळींच परिणाम झाला नाहीं. मंजिरीनें आतां शिक्षणाच्या वगैरे नसत्या उद्योगांत न पडतां मुकाट्यानें आपण सांगूं तसें वागण्यास तयार व्हावें हा त्याचा विचार मुळींच बदलला नाहीं. बायकांना हक्क पाहिजेत, कबूल. नाहीं म्हणेल तर वादाचा प्रश्न; पण हक्क तरी कशाकरतां पाहिजेत?—स्वतःचें हित पाहण्याची मनुष्याची इच्छा असणें स्वाभाविक आहे. हिताकरतां हक्क. पण हक्क बजावण्यापासून हित होईलच असा भरंवसा असेल तर हक्क मिळवण्याची खटपट करण्यांत अर्थ आहे; आणि त्यांतून, नवरा जर सर्वस्वीं आपल्याच पोळीवर तूप ओढून घेतो आहे आणि बायकोला मात्र कोंड्याची भाकरी चारतो आहे अशी स्थिति असेल तर हक्काचा प्रश्न बरोबर आहे. कदाचित् मंजिरी यावर म्हणूं शकेल कीं तहान लागल्यावर मग विहीर खणण्यांतलाच हा प्रकार आहे. नवरा पुढें दारुबाज निघणार नाहीं याला तरी काय खात्री देतां येईल? कबूल. ठराविक मर्यादेपर्यंत हा मुद्दा विचारार्ह ठरेल. पण पुन्हा एक असा प्रश्न निघतो, कीं जगांतले सगळेच नवरे दारुबाज नसतात!

विनूनें आपल्या मनाशींच या साधकबाधक विचारांचा खेळ मांडला होता. विचारांचा फारच त्रास होऊं लागला तेव्हां त्यानें सोलापूरला परत जाण्याचें ठरविलें.

मंजिरीला एकीकडे गाठून विनूनें आपला सोलापूरला परत जाण्याचा बेत तिला कळविला. पुन्हा मंजिरीच्या डोळयांपुढें 'विनू कीं शिक्षण?' हा वाद चकरा खाऊं लागला. गोष्टींतून आणि कल्पित कथानकांतून असले प्रसंग पुष्कळच वाचण्यांत येतात. 'नवऱ्याकडे एक तिरस्कारपूर्वक दृष्टिक्षेप टाकून तिनें आपली कातड्याची बॅग उचलली आणि पूना एक्स्प्रेसनें ती निघून गेली—' इत्यादि प्रकार करण्याचें अजून आपल्या बायकांच्या अंगांत धैर्य नाहीं. नाहीं तर दररोज नवऱ्याला सोडून 'कांहीं तरी करून दाखविण्याच्या' मंत्रानें मुग्ध झालेल्यां बालिकांनींच पूना एक्स्प्रेस अडवून टाकली असती. गोष्ट दिसायला सोपी आहे पण करायला मोठी कठीण आहे. नवऱ्याला सोडण्याची कल्पना कृतीमध्यें उतरवायला लागलें म्हणजे मग समजतें कसें काय तें.

नवऱ्याला सोडतांना मुख्यत्वेंकरून एक काळजी दत्त म्हणून पुढें उभी राहते. भविष्यकाळ! पुढें आपलें जमणार कसें, ही काळजी मंजिरीला सारखी बोंचत होती. बराच वेळ दोघांनाहि—एक भाषा होती तरी शब्दच सापडेनात.

"मी उद्यां परत जाणार आहें—" विनू म्हणाला. मंजिरी कांहींच बोलली नाहीं. विनू थोड्या वेळानें पुन्हा म्हणाला, "आईला काय सांगूं?—" तरीहि मांजिरी खालीं धरणीमातेकडे निरखून पाहत होती.

पुन्हा विनूनें, 'आईला काय सांगायचें?' म्हणून प्रश्न केला.

"मी काय सांगणार?—आपल्याला वाटेल तसं करा—" मंजिरी भीत भीत म्हणाली.

"आईला मुलगा सांगतो आहे, कीं 'आई, बायकोनं मला सोडचिठी दिली आहे.' काय काव्यमय संदेश आहे पण! उच्च कुलांत जन्म घेतलेल्या स्त्रियांचं अलीकडे ध्येय काय, तर नवऱ्याशीं फटकून वागणं! —आणि कशाकरतां तर चारदोन पुस्तकं जास्त घोकून लोकांनीं 'विदुषी', 'विदुषी' म्हणून गौरव करावा म्हणून! —तुम्ही विदुषी झालांत म्हणजे मग आम्ही पर्यायानं

विदूषक ठरतोंच आहोंत. विदूषक होण्याचा मान लाभत असतां, बायकांना कोंडून ठेवणारे आजपर्यंतचे लोक खरोखरीच मूर्ख होते— तुझ्या सहवासानं मी मात्र शहाणा झालों आहें—" जितकें म्हणून उपरोधिक स्वरानें बोलतां येईल तितकें विनू बोलून घेत होता आणि मंजिरी ऐकून घेत होती.

" मंजिरी, तुला एक विचारूं का ? माझा अधिकार संपला म्हणा आतां, —तरी पण राहवत नाहीं म्हणून विचारतों—माझा एवढा राग करतेस तूं,— तर तुला असं रागावण्यासारखं माझ्या हातून काय वर्तन घडलं आहे तें मेहेरबानी करून समजेल का मला ? इच्छा असल्यास उत्तर दे नाहीं तर लगेच नवरेपणाचा हक्क बजावूं लागलों म्हणून ओरडत सुटशील." विनूनें तिच्याकडे रोखून पाहत म्हटलें.

मंजिरीनें आपलें न बोलण्याचें व्रत कायम ठेवलें.

" मला कांहीं एक विचारूं नका. मला कशाचंच उत्तर देतां येणार नाहीं." मंजिरी भिंतीकडे तोंड फिरवून म्हणाली. विनूनें चटकन् पुढें होऊन मंजिरीचा हात आपल्या हातांत घेतला. मंजिरीनें दचकून एकवार त्याच्या तोंडाकडे पाहिलें.

" मंजिरी, कां उगीच असा त्रागा करून घेतेस जिवाचा ?—कुणी तुझ्या डोक्यांत हें वेड भरवून दिलं आहे ?—चल, पुरुषांनीं तरी शिकून काय दिवे लावले आहेत ? वेडे, तुला कल्पना नाहीं. फक्त कांहीं तरी व्यवसाय पाहिजे आणि पुढं चरितार्थाला साधन पाहिजे म्हणून पुरुष शिकण्याच्या खटाटोपांत पडतात, समजलीस ?—चार पिढ्या पुरेल इतका पैसा गाठीं असणारे इनामदार सहीच्याऐवजीं अंगठ्याचा मार्ग पत्करतात—पण पुस्तकाला प्राण गेला तरी शिवत नाहींत. बी. ए. म्हणवून घेण्यांत प्रौढी वाटण्याचा काळ आज राहिलेला नाहीं; आणि अशा गोष्टी दृष्टीसमोर असतांना, तुम्हां बायकांना ह्या बी. ए. चा काय ध्यास लागला आहे ? ज्ञानच मिळवायचं असेल तर तें अन्य उपायांनीं नाहीं का मिळणार—? निव्वळ अटीतटीला पडून पुरुषांशीं ही निष्कारण चढाओढ करण्यांत काय हेतु ? " विनू म्हणाला.

" तसं मीं कधींच म्हटलं नव्हतं—" मंजिरी खालीं पाहत म्हणाली.

" म्हणण्याची काय जरूरी आहे ?—दिसतंच आहे तें. बी. ए. होऊन

तुम्हांला काय मिळवायचें आहे?—तुम्हांला नोकऱ्या करायच्या नाहींत. निव्वळ चैनीकरतां म्हणावं तर तेंहि शक्य दिसत नाहीं. बुडाशीं हीच कल्पना मला तरी दिसते. तुम्हांला पुरुषांचा नक्षा उतरवायचा आहे. आम्हांलाहि बी. ए. होतां येतं आहे हें तुम्हांला पटवून द्यायचं आहे. मंजिरी, काय जरूरी आहे त्याची?—ज्ञानाविषयीं म्हणशील तर तुला मी आज सांगून ठेवतों, कदाचित् उद्यां तुला पटेल,—कीं दिवसभर काबाडकष्ट करून घरीं परतलेल्या नवऱ्यापुढं ताजी भाकरी आणि लसणाचं तिखट ठेवून, त्याच्या पराक्रमाचं कौतुक करीत बसण्यांत आनंद मानणाऱ्या एखाद्या खेडवळ बाईला जितकं ज्ञान आहे त्याच्या शतांशानंसुद्धां तुझ्या बी. ए. बाईला असणं शक्य नाहीं. ज्ञान पुस्तकांत नसतं, अनुभवांत असतं.—"

"मी सोलापूरला आलें नाहीं तर—?" मंजिरी हळूच त्याच्याकडे पाहून म्हणाली.

"नाहीं आलीस तर?—पैसे संपले म्हणजे पत्र धाडा,—आपला नोकर पैसे पाठवायला तयार आहे. फक्त नवऱ्याला अन्नूनं चार दिवस काढायचे आहेत हें विसरूं नका, आणि त्याच्या नांवानं चारचौघांत खडे फोडूं नका. आजपासून आपल्यावर जे काय हक्क गाजवतां येत होते त्या सर्वांवर मी राजीखुषीनं पाणी सोडण्यास तयार आहे,—झालें काम. आपल्याला आतां खालीं जायला कोणतीच हरकत राहिलेली दिसत नाहीं; आणि हें पहा ह्या भांडणाचा सुगावा तिसऱ्या कुणाला लागूं देऊं नका—"

सिंहाच्या तावडींतून सुटलेल्या हरिणीप्रमाणं मंजिरी तेथून पळून गेली.

* * *

मंजिरीनं आपल्याकडून होईल तितकी खबरदारी घेतली होती; पण अशा गोष्टी का लपून राहतात? सहजच वामनरावांनीं मंजिरीपाशीं पृच्छा केली, कीं आतां माहेर पुरे! सासरीं कधीं जाणार? मंजिरीनें हसून उडवाउडवी केली. तेवढ्या अवधींत वामनरावांच्या पत्नीनें केव्हांच नूर ओळखला होता. तरणी-ताठी पोर, रूपांत कांहीं वेडेंवांकडें नाहीं. बरें, तसें— म्हणावें तर तसेंहि कांहीं नाहीं! बायकांना तो सुगावा तात्काळ लागतो. मग काय कारण असावें?

वरकरणी कांहींच कळेना. विनूच्या एकंदर हावभाव, चर्चा, भाषण वगैरे प्रकारांवरून तिला थोडासा अंधुक शोध लागला. मागें एकदां विनू असाच चार दिवस वडिलांना फसवून मंजिरीला घेऊन आला होता, त्या वेळीं विनू एकटाच परत गेला. पण त्या वेळची त्याची चर्या निराळी होती. हा फरक कशानें पडला ? आणि मंजिरी त्याला पोंचवायला स्टेशनपर्यंत गेली होती. आणि या वेळेस ती माडीवरून खालींसुद्धां आली नाहीं. कां ? सगळया प्रश्नांना एकच उत्तर ! साहेब गरम झालेले आहेत; अन् मेमसाहेब घुस्सा कर रही है। अर्थात् तिनें आपला तर्क वामनरावांजवळ बोलून दाखविला.

वामनरावांना शक्यच वाटेना ! अरे, बायकोशीं तें काय भांडायचें आहे ? अन् बायकांना विचारतो कोण ? बायकांच्या तंत्रानें वागून का कुठें संसार झाला आहे ?

पण जेव्हां मंजिरीनें कॉलेजमध्यें उद्यांपासून जाणार म्हणून घरांत कळविलें त्या वेळेस मात्र हें प्रकरण बरेंचसें अंगावर येऊं लागलें. कांहीं तरी करून वेळींच लगाम घालतां आला तर ठीक, या पोक्त विचारानें त्यांनीं मंजिरीस चार शब्द ऐकविले. भाषणाच्या ओघांत चाराचे चार हजार शब्द झाले.

"ए पोरी, अग, तूं काय भांडलीस म्हणे नवऱ्याशीं, अं ?" वामनरावांनीं ! सिगारेटचा झुरका मारीत अघळपघळ आवाजानें विचारलें.

"मी ?—कधीं ?—केव्हां ? कुणाशीं ?—" मंजिरीनें पुन्हा उडवाउडवी करण्याकरतां म्हणून आपण होऊनच प्रश्नांना सुरुवात केली.

"मंजिरी, अग–तुझं लग्न करून दिलं आम्ही तें एक भांडायला तुला जोडीदार पाहिजे म्हणून कां दिलं ?—हें बघ, तूं माझं ऐक; तुला कॉलेजपर्यंत मीं शिकवलं आहे, आतां पुरें नाहीं का झालं ?–अन् त्या पोराशीं बिचाऱ्याशीं कां भांडतेस ?—" वामनराव म्हणाले.

काय व्हायचें असेल तें एकदां होऊं दे,—पुन्हा बांधा नको, या विचारानें मंजिरी शांतपणानें म्हणाली,—"दादा, माझं लग्न झालेलं नव्हतं तेव्हां तूं माझ्याशीं जसं गोडीनं वागलास, तसंच याहीपुढं चालव. घटकाभर असंच धरून चाल, कीं मी अजून पूर्वींचीच मंजी आहे—"

"धरून कसं चालूं ? अन् त्या पोराची काय वाट ?—त्याचा कांहींच नको

का विचार करायला? आतां आमचं नातं संपलं. तो सांगेल तसंच आम्ही ऐकणार—"

"मग त्यांनीं मला पुढं शिकायला कांहीं हरकत नाहीं म्हणून सांगितलं आहे." मंजिरी जाणूनबुजून सपशेल खोटें बोलली.

"शक्य नाहीं. आम्ही पुरुष कितीहि सुधारणेच्या गप्पा झोडणारे असलों तरी मुळांत पक्के पुराणमतवादी आहोंत.—विनायकराव झालें काय नि मी झालों काय, वयांत अंतर पडलं तरी मतांत कधींच अंतर पडणार नाहीं. संसार सोडून देऊन बायकोला शिक्षण घे म्हणून सांगणारे पुरुष क्वचितच आढळतील. तें कांहीं मला खरं वाटत नाहीं. तूंच त्यांच्याशीं भांडली असशील—" वामनराव सिगारेट फेंकून देत म्हणाले.

"बरं, तुझ्याच म्हणण्याप्रमाणं झालं असं मीं म्हटलं तर?" मंजिरी त्यांच्याकडे बारकाईनें पाहत म्हणाली.

"म्हणजे भांडलीसच ना?-वाटलंच मला तें—" वामनराव किंचित् हसून म्हणाले.

"माझ्या हक्काची मी कधींच पायमल्ली होऊं देणार नाहीं—" मंजिरी ताठ्यानें म्हणाली.

"अं?—काय, काय?—हें हक्काचं पिल्लूं तुझ्याहि डोक्यांत शिरलं का? मग बरोबर आहे. —तूं म्हणणार माझे हक्क अन् तो म्हणणार माझे हक्क?— हक्क म्हणजे काय ग?—तें तरी कळतंय् का?—नवराबायकोच्या सुखाच्या राज्यांत हे हक्क कसले घेऊन बसला आहांत तुम्ही?—आमच्या वेळेला नवरा आजारी पडला, कीं बायकोनं मुळुमुळू रडायचं, हा तिचा हक्क. तसं असेल तर मी त्यांना पत्र लिहितों—त्यांची समजूत घालतों.—सुखानं राजाराणीसारखं ऐटीनं राहायचं, तें दिलं सोडून, अन् म्हणे हक्क?" —वामनरावांनीं सुपारीला हक्क समजून अडकित्त्यानें काम चालू केलें.

"दादा, तूं पत्र लिहूं नकोस—" मंजिरी म्हणाली.

"अंऽऽऽ? नवऱ्याला पत्र लिहिण्याचा हक्क बायकोलाच असतो नाहीं?— बरं! तूंच लिही! पत्र असं गोंडस लिहिशील कीं नाहीं,—कीं घरांत ती थक्कच झाली पाहिजे. पाहतों तुझी विद्वत्ता—" वामनराव हसत म्हणाले.

"दादा, उगीच मला त्रास देऊं नकोस. —तूं पत्र लिहूं नकोस अन् मीहि लिहिणार नाहीं. मी त्यांच्याशीं भांडलें आहे. —मला पुढं शिकायचं आहे.— तूं कांहीं पत्रबित्र लिहूं नकोस—" मंजिरी रागानें म्हणाली.

मंजिरीला पहिल्यापासूनच वाईट वाटत होतें. विनूचा आणि आपला असल्या क्षुल्लक कारणांमुळें बेबनाव व्हावा याचें तिला राहूनराहून वाईट वाटत होतें. पण कांहीं तरी करून दाखवायला निघालेल्या मुलीनें असें हात-पाय गाळणें चांगलें का? अखिल स्त्री-जातीची उन्नति करण्याकरतां चारदोन स्त्रियांनीं स्वतःचें हित थोडेंबहुत दृष्टिआड केलेंच पाहिजे. जगाच्या उन्नतीचा प्रश्न म्हटला म्हणजे चारदोन व्यक्ति आणि त्यांचें सुख!—समाजाच्या पुढें व्यक्तीनें आपले हितसंबंध बाजूस केलेच पाहिजेत.

हा झाला तत्त्वज्ञानाचा भाग. पण व्यवहाराचा भाग मात्र अजिबात निराळा होता. 'स्वतःचें सुख दृष्टिआड करणें—' त्यांत कांहीं मोठेंसें कठीण नाहीं. पण मग विनूची काय वाट? विनूच्या जन्मदात्यांची काय वाट?— त्यांना काय वाटेल? आणि स्वार्थ सोडूं म्हटलें तरी स्वार्थ सुटेल कसा? सबंध विश्वाची उभारणी जिथें स्वार्थावर झाली आहे, तिथें स्वार्थ सोडूं म्हणतां कसा सुटेल? स्वार्थाकरतां नवऱ्याला बायको पाहिजे, स्वार्थाकरतां बायकोला नवऱ्याची गरज– लहानपणीं बालिश लीलांनीं पुरेपुरेसें करून सोडणाऱ्या आणि मोठेपणीं वंशाची वाढ म्हणून गणल्या जाणाऱ्या मुलाची आईला कां गरज असावी? चार-दोन स्नेहीसोबती आजूबाजूला पाहिजेत कशाला? नोकराची गरज मालकाला काय? आणि नोकराला तरी मालक कशाला पाहिजेत? स्वार्थ सगळा स्वार्थ! स्वार्थ आहे म्हणून जग आहे. स्वार्थाकरतां जग आहे. जगाकरतां स्वार्थ नाहीं.

घरांतल्या लहान्यालहान्या पोरांनीं 'आत्या, आत्या' करून मंजिरीची पाठ पुरवावी. 'आत्या, एक गोष्ट सांग ना ग?' म्हणून लहानग्या सुशीनें आपल्या हातानें मंजिरीचे गालगुच्चे काढावेत, आणि मग मंजिरीला वाईट वाटावें! संसारांतहि कांहीं कमी सुख नाहीं. चिमुकले हात आपल्या हातांत घेऊन त्या निष्पाप चेहऱ्याचीं 'आणखी एक साखरेचा गोडसा दे' म्हणून एकाच्या ऐवजीं एक हजार चुंबनें उपटावीं—हें कांहीं लहानसहान सुख नाहीं. आणि

आपल्या- अगदीं निव्वळ आपल्या हक्काची एखादी सुशी असती तर?— मंजिरीनें तत्काळ आपल्यां मांडीवरच्या सुशीस दूर लोटलें! काय हा वेडे-पणाचा विचार?

मंजिरी कॉलेजमध्यें जाऊं लागली; पण पूर्वीसारखा तिचा उत्साह नव्हता. कर्तव्याची भावना मनांत सारखी टोंचणी देत असतांना कोणतें काम आज-पर्यंत नीट झालेलें आहे? निव्वळ हें केलेंच पाहिजे, याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणून मंजिरी इंटरच्या क्लासांत शरीरानें हजर राहूं लागली, पण मन विनूच्या-भोंवतीं घोटाळत होतें.

त्या दिवशीं मंजिरी घरीं आली. घरांत चार बायकांचें पार्लमेंट भरलें होतें. मंजिरीच्या अस्तित्वाची त्यांना वार्ताहि नव्हती.

"पण मी म्हणतें, काय हो सुशीची आई,—तुम्हांला राग येईल; पण आपलं मेलं रहावत नाहीं म्हणून म्हणतें,—नवऱ्याला सोडून या मुली काय हो करणार?" एक बाई म्हणत होती.

मंजिरी मुकाट्यानें पुस्तक ठेवून बाहेरच ऐकत उभी राहिली.

"आतां हें पहा, बनूताई, आपलेच दात अन् आपलेच ओठ. बोलायला गेलं तर पोरगी फुटाण्यासारखी टणटण उडूं लागेल. न बोलावं तर हें असं किती दिवस चालणार? आम्हांला आमचा संसार आहेच कीं नाहीं?— आपण एक मुरळी झाली अन्—" वामनरावांची पत्नी बोलत होती.

"अहो, कसला आला आहे यांना संसार?—ढालगज भवान्या साऱ्या मुलखाच्या! संसार नको,—नवरा नको,—यांना नुसत्या टिवल्याबावल्या करीत फिरायला पाहिजे—"

मंजिरी चिडली. जातीला जात वैरी होते म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. पुरुषांच्या लाथा पत्करल्या, पण या बायकांच्या जिभा कशानें आवरणार?— रागाच्या भरांत आपण काय करतों याचें भान न राहून मंजिरी तडक माजघरांत शिरली. एका हातानें कमरेचा आधार घेत, दुसऱ्या हातानें कपाळावरचे केस सावरीत, मंजिरी खुनशी डोळयांनीं आपल्या भक्ष्याकडे टक लावून पाहूं लागली.

" उठा इथून—व्हा चालत्या, लाज नाहीं वाटत दुसऱ्याच्या कुटाळक्या करायला ! हे-हेच वाटतं तुमचे फुरसतीचे धंदे—जा इथून-नाहीं तर एकेकीला झिंज्या धरून बाहेर फरपटत ओढीन—" मंजिरी दातओठ खात ओरडली. वास्तविक पाहायला गेलें तर काय ताकद लागली होती मंजिरीची त्या बायांच्या झिंज्या ओढायला ? —त्या बायांनींच तिला होती कीं नव्हती करून सोडलें असतें.— पण रागाचा आवेश मोठा परिणामकारक असतो. आणि त्या आवेशाला पाहूनच एकेकीनं काढता पाय घेतला.

भावजय आणि वन्सं— एकीमेकींकडे पाहतच राहिल्या.

" वहिनी, विटंबनाच करायची होती माझी तर ह्याच्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता का तुला ?— तुला कृत्या म्हणूं, का राक्षसीण म्हणूं, का अवदसा म्हणूं,—कीं म्हणूं तरी काय ? काय तुझं नडलं होतं याच्यावांचून ? देवानं जीभ दिली, ती आपल्या जातीला वाकुल्या दाखवण्याकरतांच का ?— वहिनी,—तुलाहि दोन मुली आहेत—" मंजिरी म्हणाली.

" माझ्या मुलींना मी असं कधींच लाडावून ठेवणार नाहीं. माझ्या मुलींची तुम्हांला नको काळजी बरं का, वन्स ! —त्यांची काळजी घ्यायला आम्ही अजून जिवंत आहोंत—" असें म्हणून वामनरावांची पत्नी तेथून निघून गेली. मंजिरी जर पुरुष असती तर तिनें हलकटांतली हलकट शिवी उच्चारायला मागेंपुढें पाहिलें नसतें.

त्या दिवशीं वामनरावांच्या कानांवर सगळी हकीकत गेली. वामनराव मंजिरीवर कधींच रागावले नव्हते. त्यांनीं तिला हाक मारली—

" मंजे,- आज हें तूं काय मांडलं आहेस ? " वामनरावांनीं शान्तपणानें विचारलें.

मंजिरी कांहींच बोलली नाहीं. बोलण्यांत कांहींच फायदा नाहीं हें तिला पूर्णपणें कळून चुकलें होतें.

" मंजे, तुला मी शहाणी मुलगी समजत होतों. विनूशीं भांडलीस, फारसा बोललों नाहीं. —पण जळांत राहून माशाशीं वैर करण्यांत काय अर्थ आहे ? तूं माझं ऐक, अजून तूं आपल्या घरीं जा, तुझं इथं कसं पटणार, सांग मला. मी दिवसभर बाहेर. त्यांतून संसार म्हटला म्हणजे भांड्याला भांडं हें

लागणारच. बरं, माझी स्थिति पहा. तुझ्या बाजूनं बोलावं तरी मला बायकोला घराबाहेर घालवून देणं योग्य वाटत नाहीं; बरं, बायकोचं ऐकून पाठच्या बहिणीला तरी टाकून कसं बोलूं? दोन्हीकडे न बोलतां स्वस्थ कुठपर्यंत बसणार?–रागावूं नकोस,–मी सांगतों याचा नीट विचार कर. हें तुझं घर नाहीं. तुझ्या घरांत तुझी सत्ता चालेल; पण दुसऱ्याच्या घरांत तूं कशी सत्ता चालवणार?– अन् ती चालूं देईल कोण?–" वामनराव घरांत पाहत म्हणाले.

मंजिरीला समजलें, कीं भावाचा आसरा तुटला. जोंपर्यंत आपण नवऱ्याच्या घरीं होतों तोंपर्यंत सर्व मंडळी आपल्या पुढेंपुढें करीत होती. तीच मंडळी आतां आपल्या तोंडावर थुंकायला निघाली आहेत.

वामनराव मंजिरीकडे पाहून म्हणाले,

"अन् विनायक आजारी आहे म्हणून सोलापुराहून तार आली आहे आज दुपारीं. –Serious आहे म्हणून तार केलेली दिसते. उद्यां मी सोलापूरला जाणार आहे.—येणार आहेस का तूं?—"

दादाला तार येते आणि आपल्याला पत्रसुद्धां नाहीं, या कल्पनेनें मंजिरीला कसेंसेंच झालें.—दादा त्यांचा नातेवाईक! अन् मी कोण त्यांची? काय संबंध माझा त्यांचा? मंजिरीच्या पश्चात्तापास येथूनच कोठून तरी सुरुवात झाली—

"दादा, मी रात्रीं मेलनंच सोलापूरला जातें.—मला अगदीं वीट आला आहे या जगाचा. मला कोणी नको. माझा कुणाचाच संबंध नाहीं,—अजून हातचं गेलं नाहीं! आज मला लाथा मारायला निघालेल्या लोकांना दाखवीन, तरच नांवाची! मला कश्शाची —कश्शाची जरूरी नाहीं. वाटलं होतं, कीं या मार्गानं जावं,—चार लोकांचं हित साधलं तर पाहावं,—पण नाहीं.—काय वाटेल तें होऊं दे,—नवऱ्याच्या लाथासुद्धां खायला माझी तयारी आहे.—पण हें जिणं नको!—तुमचा संसार,—बसा घेऊन तुमच्या बायका नि तुमचा संसार—"

मंजिरीनें आपल्या सामानाची आवराआवर करण्यास सुरुवात केली. कोणीच तिला हरकत घेतली नाहीं.—'ए आत्या, मी येऊं का ग तुझ्या टांग्यांत?—' म्हणून सुशीच्या प्रश्नाला हातानेंच छानदारसें उत्तर मिळालें.

चार लोकांच्या निंदेकडे लक्ष न देतां स्वीकृत कार्य नेटानें चालविणारे वीर निव्वळ कल्पनेंतच असतात. मंजिरी एक सामान्य भावनाप्रधान मुलगी होती. पुढचे मागचे पाचपेच तिला बिलकूल माहीत नव्हते.—तिला कल्पना नव्हती — मनुष्यजात इतकी नादान आहे, कीं आपणहि कांहीं करून दाखवायचें नाहीं आणि दुसरा कोणी डोकें वर काढूं लागला, कीं त्याला तंगड्या धरून खालीं ओढायचें. जोंपर्यंत प्रतिकार होत नव्हता तोंपर्यंत ठीक होतें.—थोडासा प्रतिकार होणार हें तिला माहीत होतें. पण ही भाषा? मंजिरी नवऱ्याशीं भांडत असेल, म्हणून काय तिनें अब्रूवर पाणी सोडलें होतें? त्याचीच तिला चीड आली—

घरीं जाऊन काय करायचें हें तिला माहीत नव्हतें. — घरीं जायचें एवढें खरें. —पण काय करणार तिथें?

एक तर विनूच्या पायां पडावें,—काय हरकत आहे,—चूक आपली आहे. विनू कांहीं आपल्याला 'जा' म्हणून सांगणार नाहीं. —अन् म्हणालाच तसें तर?—पण छेः! सगळें जग फिरलें तरी विनू आपल्याला जा म्हणून सांगणार नाहीं, ही तिला खात्री होती.

भीतभीतच ती घरांत शिरली. तिला पाहिल्याबरोबर विनूच्या आईनें अश्रु ढाळावयास सुरुवात केली. पण म्हातारी एका शब्दानें तिला बोलली नाहीं.

मंजिरी तशीच तडक विनूच्या खोलीकडे गेली. विनूची स्थिति पाहतांच तिला रडूं कोसळलें. लहानपणीं मंजिरी फार करून रडली नाहींच. शारीरिक संतापानें काय थोडीशी रडली असेल तेवढेंच. पण मंजिरी आज एकदम लहान मुलासारखें रडूं लागली. विनूनें हलकेच डोळे उघडून तिच्याकडे पाहिलें.

झोपेंत चालणाऱ्या माणसाप्रमाणें मंजिरी हळूहळू एकेक पाऊल टाकीत पुढें झाली. तिचा सगळा गर्व,—तिची हक्कांची जाणीव,—आणि तिची स्त्री-जातीच्या उन्नतीची तळमळ,—सर्व कांहीं नाहींसें झालें आणि पुरुषापुढें गुडघे टेकणाऱ्या एखाद्या सामान्य स्त्रीप्रमाणें ती विनूच्या अंथरुणावर तोंड लपवून ढसढसा रडूं लागली. —विनूनें हलकेच तिच्या केसांवरून हात फिरवला. मंजिरीला जास्तच रडूं येऊं लागलें.

" मंजे,—मंजे,—" विनू क्षीण आवाजांत म्हणाला.

मंजिरीनें त्याचा हात घट्ट धरला.

" मंजे,—रडूं नकोस.—पूस ते डोळे.—तूं रडायला लागलीस ?—" विनू म्हणाला.

" मला कां कळवलं नाहीं ?— मी आधीं नसतें का आले—?" मांजिरी म्हणाली.

" मंजे,– तूं पुन्हा परत जाणार नाहीं—?" विनू आनंदी मुद्रेनें म्हणाला.

मंजिरीनें 'नाहीं' म्हणून मान हलविली. विनू एकदम उठूं लागला—पण अंगांत बिलकूल शक्ति उरली नव्हती.— विनू पुन्हा तसाच माघारी लवंडला.

" मंजे, मी बरा असतों तर—तर !—पण कांहीं हरकत नाहीं. मंजे,—तूं आलीस ? खरंच आलीस ?—पुन्हा नाहीं जाणार ?—बघ, नाहीं तर मला फसवशील—"

" नाहीं—नाहीं—नाहीं.—घर सोडून मी कुठं जाणार ?"– मंजिरी म्हणाली.

" मंजे,—काय बोलूं अन् काय नाहीं असं मला झालं आहे.— काका डॉक्टरकडे गेले आहेत. —ते येण्याच्या आंत मंजे,—माझ्याशीं सारखं बोलत राहा. तुला मी खरं सांगू ?— आपण कॉलेजमधें होतों अन् त्या दिवशीं तूं मला Well played Barve म्हणालीस,— आठवतंय् ?— तसं आज मला Well played विनू, म्हण. मला तस्सं,—अगदीं तस्संच म्हण—"

विनूच्या म्हणण्याखातर मंजिरी लाजत लाजत Well played विनू, म्हणून म्हणाली.

" त्याच दिवशीं घरीं जातांना—तूं म्हणाली होतीस, कीं पुरुषांप्रमाणं बायकांना क्रिकेट खेळायला परवानगी दिली तर मीसुद्धां बर्व्यांच्यासारखं खेळेन. मंजे,—आयुष्याचा खेळ खेळायला मीं तुला परवानगी दिली होती. —तूं हरलीस—मीहि हरलों. —खेळामधें जय-अपजय ह्या गोष्टी अनिश्चित असतात.—मंजे, आयुष्याचा खेळ सोपा नाहीं. —सर्वजण मोठ्या उत्साहानं सुरुवात करतात,–पण टिकून राहण्याचं आपल्यांत धैर्य नाहीं.—एकमेकांचा

हात धरूनच कांहीं करतां आलं तर पाहायचं. आपण असं भांडून काय होणार आहे ? मंजे,--इतके दिवस मला तुझ्याशिवाय कसं राहतां आलं कुणास ठाऊक! पण तूं आतां आलीस,-रडूं नकोस. मला कळलं, कीं मंजी कांहीं झालं तरी विनूची आहे.—मंजे—मला आतां मरावंसं बिलकूल वाटत नाहीं.—मंजे,—कसंहि करून मला घट्ट धरून ठेव.—मंजे, जसं कांहीं तुझाच कोणी जीव काढून नेत आहे त्याप्रमाणं मला घट्ट धरून ठेव. मंजे,—माझ्या उशाशीं बसतेस का ?—"

मांजिरीनें विनूचें डोकें आपल्या मांडीवर घेतलें.—

मिशांच्या झुबक्याअडून हसत वामनराव मुकाट्यानें खोलीच्या बाहेर पडले.

## उनाडटप्पू : : ७

“ सदरहू आरोपी धंद्यानें शिक्षक आहे. मीं त्याच्या खाजगी जीवनाची बारीक रीतीनें चौकशी करून पाह्यली; परंतु त्याच्यावर दोषास्पद अशा कोणत्याच गोष्टींचा आरोप लादतां येत नाहीं. आश्चर्याची गोष्ट ही, कीं त्याच्या शाळेंतील अधिकाऱ्यांचेंहि त्याच्याविषयीं चांगलें मत आहे. पाण्याशिवाय तो कोणत्याच पेयाला स्पर्श करीत नसतो. तंबाखू ओढावयाचीच तर ती तो फक्त नाकानेंच वर खेचतो. त्याच्यांत एकच दोष आहे आणि तो म्हणजे कालिदास वाचण्याचें दुष्ट व्यसन त्याला जडलें आहे—” वकीलसाहेब आपल्या पक्षकाराची बाजू सावरून धरण्याकरितां आपलें वक्तृत्व पाघळीत होते.

“ थांबा– हा कालिदास म्हणजे काय भानगड आहे ? ” जज्जसाहेबांनीं आपल्या डोक्याला हाताचा टेकू देऊन विचारलें.

कालिदास ही भानगड वगैरे कांहीं नाहीं. मलाहि त्याच्याविषयीं फारशी माहिती नाहीं, परंतु सुमारें १०० वर्षांपूर्वीं आपल्या या हिंदुस्थानांत संस्कृत नांवाची भाषा शाळांमधून शिकवीत असत. त्या भाषेंत कालिदास या नांवाचा एक कवि होऊन गेला असें म्हणतात. ” वकिलांनीं उत्तर केलें.

“ मला वाटतं, तीच तुम्ही म्हणतां ती भाषा शाळांतील मुलांना चोरून शिकविण्याचा आरोप याच्यावर आहे. सद्‌गृहस्था, तुझं वय तरी काय ? ” न्यायाधीशानें आरोपीस किंचित् कनवाळूपणानें प्रश्न केला.

“ पुढच्या गांधी महिन्यांत मला तेविसावें वर्ष लागेल.” आरोपीनें खालच्या मानेनें उत्तर दिलें.

" म्हणजे हा बोस महिना, पुढचा पटेल महिना आणि नंतर गांधी महिना. अरेरे! इतक्या तरुण वयांत ही आकाचाई तुला कशी आठवली? देशांतल्या कोवळ्या पोरांना सूत काढावयाला लावायचें टाकून, त्यांच्याकडून पाटीपाटी माती वाहून नेववून त्यांना शेतावर राबविण्याचें सोडून हें आचरटासारखें- कुठली ती तुझी भाषा?— असूं दे. कुठली कां असेना! तर ती भाषा शिक- विण्याचं वेड तुझ्या डोक्यांत कसं शिरलं? बोल, तुला आरोप कबूल आहे?" न्यायाधीशांनीं कठोर मुद्रेनें म्हटलें.

" होय, कबूल आहे." त्या तरुण शिक्षकानें कपाळाला हात लावून म्हटलें.

" आपल्या नियमाप्रमाणं, शिक्षा सुनवण्यापूर्वी जर तुलं कांहीं सांगायचं असेल तर सांग—"

" मला एवढंच सांगायचं आहे, कीं मी मुलांना मधून मधून संस्कृत भाषा शिकवीत असतों, त्याला कारण एवढंच, कीं संस्कृति टिकवण्याकरितां वाङ्मयांतील अभिजात लेखकांचं परिशीलन अत्यंत अवश्य आहे—" तो तरुण म्हणाला.

" काय बडबडलास राम जाणे! मग काय हल्लीं शाळांमधून वाङ्मय नसतंच कीं काय?" न्यायाधीशसाहेब किंचित् गोंधळून म्हणाले.

" असतं. पण पंजाब प्रांतांतल्या कुठल्याशा प्रसिद्ध माणसाच्या मेहुण्यानं लिहिलेले उर्दूमिश्रित हिंदी दोहरे वाङ्मय म्हणून नेमलेले असतात. हेंच आमचं आजचं वाङ्मय! या वाङ्मयाचा अर्थ फक्त परमेश्वरालाच कळत असतो. कविराज अर्थाकडे पाहण्यापेक्षां आपल्या काव्यामुळं अनर्थ कसे उडतील हेंच पाहण्यांत भूषण मानीत असतात. मातृभाषेची हकालपट्टी झालेली आहे—"

" मातृभाषा? वाः! आतां मातृभाषेची टिमकी काय म्हणून? हिंदुस्तानां- तील रहिवाशांची एकच भाषा! हिंदुस्तानी. हिंदी लोकांची भाषा हिंदुस्तानी!" न्यायाधीश म्हणाले.

" पण साहेब. मला हें पटत नाहीं. संस्कृत, मराठी इत्यादि स्वजातीय भाषांतील अमूप ज्ञान मीं 'मुलांना कां देऊं नये?" त्या तरुणानें विचारलें.

"हा जवळजवळ राजद्रोह आहे, लक्षांत ठेव! देशांतील नागरिक-सभेनं एकमतानं हिंदुस्थानीला मान्यता दिली असून, बाजारांत देवघेव करण्याइतकं हिंदुस्थानी भाषेचें ज्ञान व इतर हस्तव्यवसायांचं ज्ञान इतकंच्च वाङ्मयाचं ज्ञान मुलांच्या उपयोगीं पडणारं आहे असं सर्वांनीं कबूल केलेलं आहे, हें तुला माहीत नाहीं?" न्यायाधिशांनीं किंचित् रागानें म्हटलें.

"होय महाराज, माहीत आहे. पण मला वाटतं, १८ वर्षे वयाच्या मुलांना एवढंच जुजबी ज्ञान देणं म्हणजे त्यांची संस्कृति ठार मारून टाकणं नाहीं काय? एवढ्याशा तुटपुंज्या ज्ञानावर ते पुढं काय करतील?" तो तरुण शिक्षक नम्रपणानें म्हणाला.

"काय करतील? म्युनिसिपालिटींत मेंबर होतील, असेंब्लींत सभासद होतील, शेती करतील, देशाचं नांव वाढवतील, किंवा—किंवा माझ्यासारखे न्यायाधीश होतील!" न्यायाधीश गर्वानें किंचित् मान तुकवून म्हणाले.

"माफ करा—परंतु मला वाटतं, कीं नुसत्या हिंदुस्थानी भाषेच्या तांत्रिक ज्ञानानं आणि हस्तव्यवसायाच्या कामचलाऊ ज्ञानानं आपल्यांत फॅराडे, एडिसन, फोर्ड इत्यादि माणसं कधींच निर्माण होणार नाहींत." तो तरुण शिक्षक अजीजीनें म्हणाला.

"आपल्याला असलीं—तूं नांवं घेतलेलीं—माणसं करायचींच काय मुळीं? पहाटेच्या प्रशांत वेळेला झोपडींतून आलेली जात्याची घरघर आणि त्यावर खेडवळ पद्धतीनं म्हटल्या जाणाऱ्या ओंव्या हें जास्त गोड, का यंत्राची गिरणी जास्त गोड? तें कांहीं नाहीं. आपण खेडूत आहोंत व खेडूतच राहणार आहोंत. जास्त वाङ्मय वाचल्यानं मुलं शेफारतात अन् लेखक होतात. हें देशाचं नुकसान कोण भरून काढील? तरुण माणसा, ऐक, तुझं बोलणं बंद कर. तूं एक देशाचा प्रच्छन्न शत्रु आहे हें स्पष्ट आहे. तुला शिक्षा ऐकवण्यापूर्वी तुला कां शिक्षा द्यावी लागत आहे हें मी सांगणार आहे. जेव्हां हिंदी लोकांनीं २०३८ सालीं (जय २०३८!) इंग्रजांपासून आपलं राज्य घेतलं (जय भारतमाता!) तेव्हां देशांतील सर्व निरनिराळ्या प्रांतांतून सहा हजार लोकांची एक प्रातिनिधिक सभा या मुंबापुरीं झाली. तींत तज्ज्ञांकडून शिक्षण सुधारून घेण्याचा ठराव पास झाला. परंतु शिक्षणसुधारणेचं काम त्या वेळच्या तज्ज्ञांना

जमलं नाहीं. तेव्हां २०४८ सालीं टेंडरं मागविण्यांत आलीं. देशांतील ५ वर्षां-वरील सर्व मुलांना सक्तीचं शिक्षण कमींत कमी खर्चांत देणारी एका पंजाबांतील गृहस्थाची सूचना ताबडतोब शिरोधार्य करण्यांत आली आणि जुन्या भाषांतील ग्रंथ लागलेच जाळून टाकण्यांत आले. मुलांना १८ वर्षांच्या अवधीनंतर हिंदुस्थानी भाषेची अक्षरओळख, २० नंबरच्या सुताचा धागा काढणें, खादी विणणें, वापरणें व फाडणें, शेतांतील माती रस्त्यावर व रस्त्यावरची माती उकिर-ड्यावर आणि उकिरड्यांतील कचरा शहरांत पसरणें इ० गोष्टी आल्या म्हणजे वाङ्मयीन व धंद्याचें शिक्षण भरपूर झालें असें सर्वानुमतें ठरलें, असें जाहीर करण्यांत आलें. कदाचित् तुझ्या म्हणण्याप्रमाणं हें जास्त असेल किंवा कदाचित् कमी असेल. तुझं म्हणणं मी फक्त ऐकेन, पण ऐकून घेणार नाहीं हें ध्यानांत ठेव–परंतु तुझ्याशीं बोलण्यांत कांहींच अर्थ नाहीं. सकाळीं पडशाच्या विकारानं बेजार झालों असल्यामुळं आजचं सूत काढणं तसंच राहिलें आहे. मला माझी नोकरी टिकवली पाहिजे. तुझ्याशीं फार हुज्जत न घालतां मला आधीं घरीं पळालं पाहिजे आणि–पण, हें मी तुला कशाला सांगतों आहे? जाऊं दे! तुझ्या या उनाडपणाबद्दल तुला पांच वर्षे सक्तमजुरीची आणि तुरुंगांत असतांना रोज उर्दूचे १० शब्द पाठ करण्याची सजा मी तुला देत आहे."

न्यायाधीशांनीं विजयी मुद्रेनें खिडकींतून दूरवर दिसणाऱ्या निळसर आकाशाकडे पाहत म्हटलें.

---

*

# उद्योग, उत्साह आणि उत्कर्ष! : : ८

(तरुणांनो, ही गोष्ट तुमची आहे.)

दुपारच्या जिलबीच्या आकंठ भोजनावर संध्याकाळीं बहुतेक एखादी सोड्याची बाटली हा सर्वविश्रुत परिपाठ आहे; परंतु शिरू (श्रीधर) या नियमाला अपवाद होता. दुपारच्या दक्षिणेच्या जोरावर संध्याकाळीं खुषबूदार चिवड्याची कागदाची निमुळती पुडी हा त्याचा आवडीचा कार्यक्रम असे. 'रुचिर्हिभिन्ना' म्हणून म्हणतात त्यांतलाच हा प्रकार!

आजहि त्यानें परंपरेनुसार चिवड्याची पुडी आणली होती. परंतु आजच्या चिवड्याची लज्जत कांहीं तरी न्यारीच असावी असा त्याच्या जिभेला संशय येत असल्याचें स्पष्ट दिसत होतें.

होतां होतां त्यानें पुडीचा कागद सबंध उघडला. आणि त्यांत त्याला काय दिसलें?—

नोकरीच्या मागें लागून शेवटीं थोबाड रंगल्यामुळें दुःखित होत्साता खिन्न मुद्रेचा एक तरुण आणि त्याच्याच पलीकडे उद्योगाच्या वारूवर मांड ठोकून, उत्साहाचा ऐसपैस लगाम हातीं धरून, विजयी मुद्रेनें उत्कर्ष-देवतेच्या उज्ज्वल यशोमंदिराकडे भरफेक धाव घेणारा मुंडासेवाला तरुण वीर—!

आणि खालीं लठ्ठ अक्षरांत—

"हें चित्र पहा आणि हें चित्र पहा."

वास्तविक खरें सांगायचें म्हटलें म्हणजें हेंहि चित्र पाहण्यासारखें नव्हतें आणि तेंहि नव्हतें; परंतु केवळ मासिक संपादकाच्या आग्रहाखातर शिरूनें दोन्हींहि चित्रें पाहिलीं आणि त्यांत थोडें स्फूर्तीचे संपादकीय फवारे त्याच्या दृष्टीस पडले.

" आम्ही एकमेवाद्वितीयम् आहोंत. कारण आम्ही निंदकाकडे लक्षच देत नाहीं. तुम्हीहि तसेंच करा."

आणि याच मासल्याच्या चिनी भाषेंतल्या आणखी चारदोन आचरट म्हणींहि त्यानें पाहिल्या.

शिरूच्या जिज्ञासेनें अकस्मात तीन मजली पेट घेतला. हें काय प्रकरण आहे ? हा एवढा परोपकाररत संपादक कोण ? हा कोण तरुणांचा कैवारी ? आणि हें कसलें यशोमंदिर–?

—२—

शिरूचें शिक्षण बेताचेंच होतें. अगदीं माफक होतें म्हटलें तरी चालेल. इंग्रजी चवथ्या इयत्तेंत असतांना त्यानें आधुनिक शिक्षणपद्धतीच्या रणावर म्हणा अगर सवंग देशभक्तीनें प्रेरित होऊन म्हणा, शाळेस कायमचा रामराम ठोकला होता. परंतु वडिलांच्या वशिली पुण्याईनें त्याला आज वॉटर वर्क्समध्यें २५ रुपयांची नोकरी लाभली होती. पाणीदार पोर कसाबसा पाण्याच्या कामावर चिकटला होता.

दुर्दैव त्याचें म्हणून त्याला त्या दिवशीं जें नको होतें तें वाङ्मय वाचावयाला मिळालें.

महिन्याच्या पहिल्या तारखेला त्यानें पगारांतून जरूर ती रक्कम 'मानवोद्धार' मासिकाच्या कृपाळू संपादकाकडे भेजून दिली आणि महिन्याच्या महिन्याला हप्त्याहप्त्यानें तो आपली ज्ञानलालसा तृप्त करून घेऊं लागला.

वडिलांनीं थोडीशी कुरकूर केलीच; परंतु मुलगा ज्ञानार्जन करूं पाहत आहे तेव्हां उगीच एखाद्या पवित्र कार्याच्या आड बळेंच कां या, या सदिच्छेनें प्रेरित होऊन त्यांनीं फारशी हरकत घेतली नाहीं.

मात्र एके दिवशीं सकाळीं सात वाजतां शिरू नेहमींप्रमाणें नोकरीकरितां घराबाहेर पडला नाहीं, तेव्हां मात्र त्यांचें धाबें दणाणलें. बराच वेळ ते अंगणांत मुलाची वाट पाहत होते.

"शिरू—" शेवटीं त्यांनीं हाक मारली.

शिरूनें कांहींच उत्तर केलें नाहीं. पुन्हा वडिलांनीं हाक मारली. तेजस्वी तरुण हातांतल्या छत्रीच्या मोडक्या काठीचा घोडा करून तडफेसरशी बाहेर आला आणि तरुणानें वृद्ध पिताजींना चार महिनेपर्यंत तुफान खवळणाऱ्या आपल्या हृदयाची ओळख चार मिनिटांत करून दिली.

"अण्णा, नोकरीनं आपल्याला गुलाम बनवलं आहे. गुलामांना स्वत्व नाहीं. गुलाम होऊन राहण्यापेक्षां मरण शतपटीनं—नव्हे, सहस्रपटींनीं बरं. अण्णा, माणसांत जिवंतपणा पाहिजे, धडाडी पाहिजे, मुसंडी पाहिजे. कल्पनेच्या अबलख वारूवर स्वार होऊन, उजव्या हातांत धडाडी हीच तलवार, डाव्या हातांत उत्साह हीच ढाल करून दिगंत पराक्रम गाजवणं हेंच तरुणाचं उच्चतम ध्येय—" इत्यादि, इत्यादि.

वडिलांनीं टाळ्या पिटल्या नाहींत. त्यांनीं एकदां सुरुवातीला जो आ केला तो शेवटपर्यंत कायम. साध्याभोळ्या वृद्ध डोक्याला हें धडाडीचें आधुनिक कंत्राट कसें उमगावें? मराठ्यांच्या इतिहासांत नांव कमावण्याजोगा हा असा समशेरजंग घोडेस्वार आपल्या टीचभर घरांत ओलेंकोरडें खात वावरत असेल हें त्यांना संभवनीयच वाटेना.

त्यांनीं त्याला आग्रहानें विनवून सांगितलें, लोभानें सांगितलें, आर्जवानें सांगितलें, धाकदपटशा देऊनसुद्धां सांगितलें, परंतु त्या तेजस्वी वीराला तें पटणें शक्य नव्हतें.

"अण्णा, विचार करा! राष्ट्र कुठं आहे? आपण कुठं आहोंत? 'चिंगचुंग' म्हणतो, 'प्रत्येक तरुणानं पुढं आलं पाहिजे.' 'लिंगलुंग' म्हणतो, प्रत्येक तरुणानं मागं राहिलं नाहीं पाहिजे. मानवोद्धाराचा संपादक म्हणतो, 'पुढं या.' अण्णा, पुढं येणं हें आम्हा तरुणांचं कर्तव्य आहे. तुम्ही म्हणतां, मागं ये. राष्ट्राचं काय होईल मग?" शिरूनें म्हटलें.

वडिलांनीं स्वतःच्या कपाळाला हात लावला!

—३—

शिरूची नोकरी अर्थातच सुटली. चिंगचुंगच्या उपदेशाप्रमाणें तो पुढें आला वडिलांच्या उपदेशास न जुमानतां तो फेरीवाला म्हणून राष्ट्राच्या म्हणजे आळींतील लोकांच्या पुढें आला. तो एक स्वावलंबी तरुण बनला. दोन पैशाच्या लिमलेटच्या गोळया विकण्याकरितां दिवसाचे दहा ते बारा तास गल्ली-चोळांतून फिरूं लागला. पैशाचा टांक एकाद्याच्या गळयांत घालण्याकरितां तो तहानभूक विसरून हातांतील गाडी ढकलीत अनवाणी उन्हांतून फिरूं लागला.

एवढें तो राष्ट्राकरितां करूं लागला.

परंतु एके दिवशीं संध्याकाळीं त्याचे पाय ठणकूं लागले.

दुसऱ्या दिवशीं त्याचें डोकें तापलें.

तिसऱ्या दिवशीं तो अंथरुणाला खिळला; तरीहि तो मानवोद्धाराचे अंक वाचण्याचें सोडीना.

आईनें त्याला खूप सांगितलें, परंतु त्याला अजून त्याचें यशोमंदिर गाठावयाचें होतें.

चार दिवस गेल्यानंतर तो एके दिवशीं मोठ्या कष्टानें गाडी ढकलीत घराबाहेर पडला.

पुढच्याच कोपऱ्यावर एक लहान मुलगा त्याच्याजवळ साबणाची चौकशी करूं लागला.

" वरती माझी ताई आहे तिला दाखवतो " म्हणून तो मुलगा साबणाची पेटी घेऊन घरांत गेला. शिरूनें सहजच वर खिडकीकडे दृष्टि टाकली. सुमारें त्याच्याच वयाची निमगोरेलेशी तरुणी हसतमुखानें त्याच्याकडे पाहत उभी असलेली त्यानें पाहिली. फेरीवाल्याला सुद्धां सुंदर चेहऱ्याचा मोह पडतो. इतक्यांत शेजारच्या खिडकींतून एका दंतविहीन वृद्ध गृहस्थानें त्याला वर हाक मारली. शिरूनें गाडी रस्त्याच्या कडेला नीट लाविली. तो वर धावतच गेला.

क्षुल्लक दहा आण्यांच्या साबणाच्या पेटीविषयीं त्याला जवळ जवळ एक तास खर्च करावा लागला. पंचवीस वेळां तो वृद्ध गृहस्थ आणि ती तरुणी घरात तो साबण कुठल्या तरी पोक्त आजीबाईंना दाखवीत होते. साबण विकत घेत होते–तें जणूं काय एखादे राष्ट्र विकत घेण्याइतकें कठीण होतें असेंच वाटलें असतें.

"साबण स्वदेशी आहे काय?" पपलीन कोट घातलेल्या वृद्धानें प्रश्न केला. "स्वदेशी म्हणजे? अस्सल शंभर टक्के स्वदेशी!" शिरू उद्गारला.

"तरीऽऽऽच?" म्हणून म्हणत अर्थसूचक मुद्रेनें तो वृद्ध हसला. "हें पाहा तुम्ही उद्यां या." ती तरुणी पुटपुटली.

भोळा शिरू एक तास उभा राहण्याची शिक्षा भोगून रिक्तहस्तानें खालीं उतरला. स्वदेशी मालाला लोकांनीं 'तरीऽऽऽच' म्हणून कां संबोधावें हें त्याला कळणें शक्य नव्हतें.

दुसऱ्या दिवशीं तो पुन्हा त्याच घरासमोर येऊन उभा राहिला. पुढें वाढून ठेवलेल्या प्रसंगाची जर त्याला अणुरेणु कल्पना असती तर तो त्या वाटेला पुन्हा गेला नसता. त्याच दिवाणखान्यांत त्यानें नवोदित आशेनें प्रवेश केला. पपलीन कोट-विभूषित वृद्ध महात्मा केसरीचा अंक पुढ्यांत घेऊन राजकारणाशीं कोल-त्याचा खेळ खेळत बसले होते. कालची निमगोरी तरुणी तेथें नव्हती. शिरूनें नाजुकपणानें खाकरून आपल्या आगमनाची वर्दी सूचित करण्याचा प्रयत्न केला.

केसरीचें राजकारण बाजूस सरलें. चष्म्याच्या भिंगांतून दोन पिचपिचीत बुबळें त्याच्याकडे रोखून पाहूं लागलीं. "हूं–काय? आलांत? ठीक झालं. आमचा त्रास वांचला..." हे त्यांचे शब्द ऐकून शिरूला आश्चर्य वाटलें.

"हें पाहा मिस्टर, जरा स्पष्ट बोलतों, माफ करा. काल या दिवाण-खान्यांतून माझ्या घड्याळाची सोन्याची सांखळी नाहींशी झाली आहे. तुम्हांला कांहीं खुलासा करतां येईल काय?—" तो वृद्ध म्हणाला.

शिरूला जास्तच आश्चर्य वाटलें.

"पोलिसांत वर्दी दिलीच आहे. पोलिस आतां येणार आहेत. काल दिवाण-खान्यांत, तुम्ही, मी आणि आमची नमू ह्या तिघांशिवाय कुत्रंसुद्धां फिरकल्याचं

दिसत नाहीं–" शिरूला आतां मात्र मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. परंतु भविष्यकाळचें साधारण स्वरूप लक्षांत येऊन भीति मात्र वाटली. ऐन थंडीच्या दिवसांत त्याचा सदरा घामानें ओलाचिंब झाला. पोलिस आले आणि रीतसर चौकशी होऊन संशयास्पद या सदराखालीं शिरूला चौकीवर नेण्यांत आलें.

रस्त्यानें त्याला त्रिभुवन जरी नाहीं तरी स्वतःचें घर मात्र स्वच्छ आठवलें.

रस्त्यानें जातांना त्याला चक्क कळून आलें कीं कर्मयोगी बनण्याचा प्रयत्न करणें म्हणजे स्वतांचें कर्म ओढवून घेण्यासारखें आहे. त्याला कळून चुकलें, कीं इच्छा आहे त्या ठिकाणीं मार्ग असेलच अशी खात्री देणें मूर्खपणाचें आहे. जग, जीवित आणि जय या परस्परविरोधी कल्पना असून मी करीन म्हणून सर्वांत तेजस्वी गणल्या गेलेल्या भाषेंतील शब्दसमूहाला प्रत्यक्ष व्यवहारांत काडीचीहि किंमत नसते.

त्यानें मनाशीं निश्चय करून टाकला, कीं जर ही भानगड मिटली तर पुन्हा असल्या चुका करण्यापेक्षां कांहींच न करणें हाच बिनधोक राजमार्ग आचरावयाचा !

मानवोद्धारांत फेरीवाल्याच्या आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या गोष्टी अजीर्ण झालेल्या लेखकाच्या लेखणींतून बाहेर पडलेल्या असाव्या. आपला भाग्योदय आपण बळेंच ओढवून घेण्यांत भाग्यक्षय होण्याचाच संभव मात्र जास्त—

त्यानें हळूच त्या शिपायाला हाक मारली. " शिपाई-दादा, अहो नाईकसाहेब, हवालदारसाहेब, कोतवाल, समशेरबहादूरजंगसाहेब. "

दोरी धरणाऱ्या यःकश्चित् शिपुरडयानें एक जोराचा हिसडा मारला !

—४—

दुसऱ्या दिवशीं शिरूला सोडण्यांत आलें. सोन्याच्या सांखळीचा पत्ता लागला होता. सदरहू सांखळी त्या वृद्ध कपींनीं सहजच विसरभोळेपणानें विडयांचा चोथा समजून पिकदाणींत टाकून दिली होती. आणि हें त्यांना तो चोथा खिशांत हाताला लागला तेव्हां समजून आलें.

अशा तऱ्हेचा हा गफलतीचा प्रकार त्या वृद्ध रावबहादुरांकडून नेहमींच होत असे. त्यांतलाच आजचा प्रकार !

बोलतां बोलतां तोंडांतल्या विडयाचा चोथा खिशांत टाकला गेला. आणि हातांतील सांखळीचा मुटका पिकदाणींत पडला. धांवपळ करून त्यांनीं पोलिसांत सांखळी सापडल्याचें सांगितलें आणि शिरूची मुक्तता केली.

शिरू तडक घरीं गेला. त्याची आई देवापुढें रडत बसली होती. वडील एका जीर्ण तक्क्याचा आश्रय करून निवांत पडले होते.

दोन दिवस शिरूला कोणीच कांहीं बोललें नाहीं. तिसऱ्या दिवशीं रागरंग ताडून त्याचे वडील त्याला म्हणाले, "शिरू, लक्षांत घे, कीं थंड पाण्याची आंघोळ प्रकृतीला फार उत्तम म्हणून डॉक्टर वैद्य म्हणत असले, तरी अशक्त प्रकृतीच्या माणसानें त्यांचें म्हणणें थट्टेवारी नेण्यापलीकडे कांहींच करूं नये. जोरकस वाङ्मय उत्तम कुणाला? खाईखाई करून बद्धकोष्ठाची व्यथा जडलेल्या ऐतखाऊंना. तुला नाहीं. तुला अजून वाङ्मयप्रांताची तोंड ओळखसुद्धां नाहीं रे? मासिकाचा उगम लोकांच्या कल्याणाकरतां नसतो हें तुला काय कळणार? गुबगुबीत खिशाच्या जोरावर कोणताहि संपादक वाङ्मयाच्या तात्त्विक बोलाचे खडे लोकांना चारायला केव्हांहि मागें पाहत नसतो. तसा जर प्रकार त्यांनीं केला नाहीं तर त्यांचें मासिक तुझ्यासारखीं अर्धशिक्षित खुळचटं कधींच वाचणार नाहींत! पोटदुखी किंवा कपाळशूळ असलेल्या माणसांना कोणत्याहि जाहिरातीवर विश्वास टाकायला दिक्कत वाटत नाहीं, त्याप्रमाणं संसाराची कशीबशी तोंडमिळवणी करणाऱ्यांना पैशावांचून लक्षाधीश कसें होतां येतं ही अभूतपूर्व कथा वाचतांना अतिशयोक्तीचा मुळींच वास येत नाहीं. शिरू, पुन्हा उद्यां त्या साहेबाकडे चल, पाहूं एकदां खटपट करून."

वडिलांचा उपदेश शिरूनें लक्ष लावून ऐकला. हातांतल्या मानवोद्धाराच्या अंकाचे त्यानें राईराईएवढे तुकडे केले. पुन्हा म्हणून जोरदार वाङ्मयाला शिवणार नाहीं अशी त्यानें मनांतल्या मनांत शपथ घेतली.

फेरीवाल्याचा पुन्हा पंचवीस रुपड्यांचा धनी हा असा झाला!